# VYUTPATTIPRADÎPA;

OR

# A MANUAL

OF

## ETYMOLOGY OF THE MARÂṬHÎ LANGUAGE.



BY

GOVIND SHANKAR SHÂSTRÎ BÂPAT.

FOURTH EDITION—Revised and Enlarged.

16,000 COPIES.





PRINTED AND PUBLISHED

BY

TUKÂRÂM JÂVAJÎ,

PROPRIETOR OF JAVAJI DADAJI'S "NIRNAYA-SAGAR" PRESS.

1894.

# व्युत्पत्तिप्रदीप.



हें पुस्तक,

गोविन्द शङ्कर शास्त्री बापट

यांनीं केलें.

शोधून वाढविलेली आवृत्ति चवथी.

१६,००० प्रती.



मुंबईमध्यें;

जावजी दादाजी यांच्या

"निर्णयसागर" छापखान्याचे मालक तुकाराम जावजी यांनीं छापून प्रसिद्ध केलें.

सन १८९४ इसवी.



किंमत ३ आणे.

# प्रस्तावना.

भाषेंतील शब्दांची व्युत्पत्ति जाणणें, हें भाषा चांगली येण्यास आवश्यक आहे. इंग्रजींत तर, शब्दव्युत्पत्ति हा एक व्याकरणाच्याच भाग समजतात. मराठीसारख्या प्राकृत भाषेंतील शब्दांची व्युत्पत्ति समजणें तर फारच आवश्यक आहे. कारण, त्यापासून भाषेंत फेरफार कसे होतात तें कळतें. युरोपांत या व्युत्पत्तिशास्त्राचा इतका प्रसार झाला आहे कीं, त्यापासून इतिहास वगैरे विषयांसंबंधी अनेक शोध लागले आहेत. प्रस्तुत मराठी भाषेंतील शब्दांची व्युत्पत्ति जाणण्यास कांहीं साधन नाहीं, असें जाणून व कित्येक मित्रांच्या सूचनेवरून, इंग्रजींत शब्दव्युत्पत्ति या विषयावर जीं पुस्तकें आहेत त्या नमुन्यावर हें लहानसें पुस्तक तयार केलें आहे. हल्लीं मराठी शाळांत शब्दसिद्धिनिबंध चालू आहे, त्यांत, बहुतकरून केवळ संस्कृतशब्दांचीं व्युत्पत्ति सांगितली आहे. व कित्येक ठिकाणीं ती व्युत्पत्तिही चमत्कारिक दिली आहे. उदाहरण, अंगना हा शब्द अग् धातूपासून दिला आहे; परंतु हा शब्द 'अंगात्कल्याणे' या गणसूत्रानें प्राशस्त्यार्थीं मत्वर्थीं न प्रत्यय होऊन झाला आहे. तसेंच, गोमय हा शब्द 'गोश्च पुरीषे' या सूत्रानें विकारार्थीं मय प्रत्यय होऊन झाला आहे; असें असून तो गोम् धातूपासून झाला आहे असें दिलें आहे, हें बरोबर नाहीं. अशीं आणखी बरींच उदाहरणें आहेत.

आलीकडे अपभ्रष्टचंद्रिका ह्मणून एक पुस्तक प्रसिद्ध झालें आहे; परंतु त्यांत अकरा रुद्र, चौदा विद्या, चौसष्ट कळा, अठरा धान्यें, वगैरे शब्द पाहतां त्या पुस्तकाचा उद्देश केवळ शब्दव्युत्पत्ति सांगण्याचा नाहीं, असें वाटतें व कित्येक ठिकाणीं व्युत्पत्ति दिली आहे, तींत केवळ अर्थसादृश्य असल्यामुळें, या शब्दापासून हा शब्द झाला असें मानिलें आहे. अडकाष्टा वगैरे शब्द पाहिले असतां हें ध्यानांत येईल.

वररुचि व हेमचंद्र यांनीं प्राकृत भाषेच्या व्याकरणांत अपभ्रंशाचे नियम सांगितले आहेत, परंतु एका नियमापासून पुष्कळ शब्द होतात, असे व्यापक नियम फारच थोडे आहेत, त्यांतील बहुतेक पुढें दिले आहेत. जे व्यापक नसून एक दोन शब्दांसच लागणारे, त्यांचा विशेष उपयोग नाहीं ह्मणून ते येथें दिले नाहींत. व ज्या शब्दांची व्युत्पत्ति संशयित दिसली असेही शब्द या पुस्तकांत दिले नाहींत.

हें पुस्तक तयार करतांना धातु, शब्द, वगैरे पहाण्यास सिद्धांतकौमुदी, अमरकोश, वररुचिकृत प्राकृतप्रकाश, हेमचंद्रकृत प्राकृत व्याकरण, मोलस्वर्थ साहेबांचा कोश, वगैरे पुस्तकांचें साहाय्य घेतलें आहे. यवनी शब्दांची यादी दिली आहे, ते सर्व मोलस्वर्थ साहेबांच्या कोशांतून घेतले आहेत. याशिवाय जान् बीम्स् नांवाच्या विद्वान् व शोधक गृहस्थानें इंग्रजींत 'अर्वाचीन आर्य भाषांचें तुलनांदर्शक व्याकरण' या नांवाचा जो उत्तम ग्रन्थ लिहिला आहे त्यांतीलही कांहीं सूचना घेतल्या आहेत.

या पुस्तकाविषयीं लोकांत कितपत अभिरुचि होईल हें कळत नाहीं; याकरितां, याचा विशेष विस्तार केला नाहीं. परमेश्वरकृपेनें लोकांस आवडून दुसऱ्या आवृत्तीचा प्रसंग आल्यास पुष्कळ सुधारणा करितां येईल.

या पुस्तकाचा हस्तलेख विद्वच्छ्रेष्ठ **रा. रा. रावबहादूर माधवराव गोविंद रानडे** यांस दाखविला, व त्यांनीं तो कृपा करून पाहिला, व कांहीं उपयुक्त महत्वाच्या सूचना केल्या, त्यांबद्दल त्यांचे मोठे उपकार मानितों. त्याप्रमाणेंच, **प्रोफेसर रामकृष्ण गोपाळ भांडारकर** यांनींही या पुस्तकाचा उपयुक्तपणा ज्यांच्या योगानें वाढेल अशा बऱ्याच सूचना केल्या, त्यांबद्दल त्यांचेही मोठे उपकार आहेत.

मुंबई,
तारीख २२ डिसेंबर १८८४.

**गो. शं. शा. वा.**

# दुसऱ्या आवृत्तीची प्रस्तावना.

पहिली आवृत्ति छापण्यापूर्वीं या पुस्तकाचा हस्तलेख बरींच वर्षें लिहिलेला होता. तो बऱ्याच विद्वानांनीं पाहिला. त्यांचीं भिन्न भिन्न मतें पडल्यामुळें, छापणें लवकर झालें नाहीं. यामुळें दुसऱ्या आवृत्तीचा प्रसंग इतका लवकर येईल असें वाटलें नव्हतें. परंतु सात आठ महिन्यांतच दुसरी आवृत्ति काढण्याची वेळ आली, त्यामुळें सुधारणा करण्यास फुरसत फार थोडी सांपडली. प्रथमावृत्ति निघाल्यावर मोठमोठ्या शाळांतील मराठी शिकविणारे गुरु व परीक्षा घेणारे अधिकारी यांस, पुस्तक अधिक उपयुक्त होण्यास आणखी काय सुधारणा केली पाहिजे, याबद्दल विचारिलें होतें. त्यांकडून ज्या सूचना आल्या त्यांपैकीं घेतां आल्या तितक्या घेतल्या आहेत. दुसरीही पुष्कळ माहिती स्वतःच्या कल्पनेनें व ग्रंथांच्या साहाय्यानें मिळाली ती या आवृत्तींत दिली आहे. यूरोपांतील प्रसिद्ध विद्वान् माक्स् मुलर यांचे भाषाशास्त्रावरील ग्रन्थ, म्यूर साहेबांचे संस्कृत भाषेच्या संबंधानें ग्रन्थ, इत्यादि इंग्रजी भाषेंतील पुस्तकें वाचतांना, त्यांत जी उपयुक्त माहिती मिळाली, तीपैकीं मराठी वाचकांस अवश्य अशी वाटली ती ह्या पुस्तकांत दिली आहे.

हें पुस्तक थोडें कठिण झालें, असें कित्येक शिक्षकांचें ह्मणणें आहे, तें कांहीं अंशीं खरें आहे. कोणतीही गोष्ट नव्या रीतीनें शिकूं लागल्यास आरंभीं कठिण वाटावयाचीच. तीच प्रचारांत पडली ह्मणजे सोपी वाटूं लागते. तसेंच या पुस्तकांतील सर्वच माहिती सर्व विद्यार्थ्यांकरितां आहे असें नाहीं. कठिण भाग वाटेल तो आरंभीं शिकवूं नये. तो पुढल्या इयत्तेंतील मुलांस सुलभ वाटेल. कांहीं माहिती केवळ शिक्षकांकरितांच दिली आहे. कारण, जो विषय जितका शिकविणें आहे, त्याची त्यापेक्षां जितकी पुष्कळ माहिती असेल, तितकी चांगलीच. असें असलें तर तोच भाग उत्तम रीतीनें शिकवितां येतो, हा सर्व शिक्षकांस अनुभव आहे. तसेंच ज्यांस इंग्रजी शिकण्याचा प्रसंग आला नाहीं, त्यांस यूरोपखण्डांतील पंडितांत भाषाशास्त्राचा कोणत्या प्रकारें अभ्यास चा-

लला आहे, त्याचें दिक्प्रदर्शन व्हावें, याकरितां पुरवणींतील माहिती दिली आहे. सांपडलेल्या अवकाशांत करतां आली तितकी सुधारणा या आवृत्तींत केली आहे. ' सर्वः सर्वं न वेत्ति ' ह्मणजे सर्वांस सर्व गोष्टी माहीत नसतात, अशी संस्कृतांत ह्मण आहे, त्याप्रमाणें यांत कांहीं चुका राहिल्या असतील. चूक लागणें हा मोठासा दोष नव्हे, पण ती कोणीं दाखविली असतां कबूल न करणें हा मात्र मोठा दोष होय. हा ब-याच लोकांच्या आंगीं असतो, यामुळें चूक कबूल करणें हा एक मोठा गुण समजला जातो. जे कोणी शिक्षक किंवा इतर विद्वान् हें पुस्तक लक्षपूर्वक वाचून त्यांतील दोष मला कळवितील, किंवा अमुक प्रकारची आणखी सुधारणा पाहिजे असें सुचवितील त्यांचे मी मोटें उपकार मानीन.

मुंबई, एल्फिन्स्तन् हैस्कूल, तारीख ३ मार्च १८८६. } **गो. शं. शा. बा.**

## चौथ्या आवृत्तीची प्रस्तावना.

ज्या धातूंपासून मराठी शब्द निघाले नाहींत असे धातु या पुस्तकांत आले नाहींत, ते दिले असतां संस्कृत धातूंपासून नामें वगैरे करण्याचे नियम दिले आहेत त्यांचा चांगला उपयोग होईल अशी कित्येक शिक्षकांनीं सूचना केल्यावरून या आवृत्तींत प्रसिद्ध संस्कृत धातूंचा कोश दिला आहे, त्यापासून पुस्तकाचा उपयुक्तपणा वाढेल अशी आशा आहे.

मुंबई, तारीख १ जानेवारीं १८९४. } **गो. शं. शा. बा.**

# व्युत्पत्तिप्रदीप.

## उपोद्घात.

ज्याच्या योगानें मनुष्यें बोलण्यानें किंवा लिहिण्यानें दुसऱ्यास आपला मनोभाव कळवितात, असा जो शब्दसमूह त्यास भाषा असें ह्मणतात.

भाषा दोन प्रकारच्या असतात. अव्युत्पन्न किंवा मूलभाषा आणि व्युत्पन्न किंवा प्राकृतभाषा.

अव्युत्पन्न[1] किंवा मूलभाषा.—दुसऱ्या उपलब्ध भाषांपासून उत्पन्न झाल्या नसून, प्राचीनकाळीं सुधारलेल्या लोकांचे ग्रन्थ ज्यांत लिहिलेले आहेत, व ज्यांपासून दुसऱ्या अनेक भाषा उत्पन्न झाल्या आहेत, अशा भाषांस अव्युत्पन्न किंवा मूलभाषा असें ह्मणतात. संस्कृत, ग्रीक, लातीन, आरबी, हिब्रू, या मूलभाषा होत. अशा भाषा थोड्या आहेत. या भाषांपैकींही कांहीं भाषांत द्वि, त्रि, सप्तन्, दशन्, माता, पिता, भ्राता, दुहिता, इत्यादिकांचे वाचक परस्परसदृश असे शब्द आढळतात, त्यांवरून अतिप्राचीनकाळच्या लोकांची कांहींएक भाषा असावी, आणि तीपासून ह्या भाषा झाल्या असाव्या, असा कित्येक विद्वानांचा तर्क आहे; तथापि, अशी भाषा ग्रन्थांत किंवा बोलण्यांत विद्यमान नसल्यामुळें यांसच मूलभाषा असें ह्मणतात.

व्युत्पन्न किंवा प्राकृतभाषा.—प्रकृति ह्मणजे मूळ, ह्मणून मूलभाषेपासून ज्या भाषा उत्पन्न झाल्या, त्यांस व्युत्पन्न किंवा

---

१. पुरवणी १ पहा.

प्राकृतभाषा असें ह्मणतात. ह्या प्राकृतभाषा दोन प्रकारच्या आहेत. प्राकृत आणि देशी. साक्षात् मूलभाषेपासून उत्पन्न झालेल्या ज्या भाषा, त्या प्राकृत होत. जसें मागधी, पैशाची, शूरसेनी, महाराष्ट्री, ह्या संस्कृत भाषेपासून निघालेल्या प्राकृत भाषा होत.

आरबी, लातीन, ग्रीक, या भाषांपासून साक्षात् निघालेल्या भाषा युरोप आणि आशिया खंडांतील कित्येक देशांत प्रसिद्ध आहेत.

प्राकृतभाषेपासून निघाल्या असून ज्यांत दुसऱ्या भाषांचेही अनेक शब्द आहेत, अशा ज्या हल्लीं व्यवहारांत असलेल्या भाषा त्या देशी भाषा होत. मराठी, गुजराथी, इंग्रजी, या सर्व असल्या प्रकारच्या भाषा आहेत.

---

१. ज्या विद्वान् गृहस्थांनीं या पुस्तकाचा हस्तलेख पाहिला, त्यांपैकीं कित्येकांस वर सांगितलेलें देशीभाषेचें लक्षण मान्य नाहीं. त्याचें कारण असें दिसतें कीं, देशी, हें नांव ज्या शब्दांची व्युत्पत्ति संस्कृतांत सांपडत नाहीं, त्यांस प्राकृत व्याकरणकारांनीं दिलें आहे. असें असलें तरी वर ज्या अर्थानें देशी शब्दाचा प्रयोग केला आहे, तसा करण्यास प्रत्यवाय नाहीं. कारण, संस्कृत, प्राकृत, आणि देशी, हा जो प्राकृत व्याकरणकारांनीं विभाग मानला आहे, तो कित्येक ठिकाणीं भाषांचा नसून शब्दांचा आहे. व त्या देशी शब्दाचा अर्थही देशांतील शब्द असाच आहे. कित्येक ग्रन्थकारांनीं प्राकृतभाषांसही देशी ह्मटलें आहे. हल्लीं आपल्या देशांतल्या अशा तीन भाषा आपणाजवळ आहेत. संस्कृत आणि प्राकृत या दोन ग्रन्थभाषा, व तिसरी बोलण्याची भाषा. ज्या भाषेनें देशांतील लोक व्यवहार करतात तिला देशभाषा असें ह्मणतात. ह्मणून तोच शब्द येथें कायम ठेविला आहे. जे शब्द तत्सम किंवा तद्भव नाहींत ते देशी, अशा अर्थानें जरी जुन्या ग्रन्थकारांनीं प्रयोग केला, तरी संस्कृत किंवा प्राकृत या केवळ ग्रन्थभाषांहून वेगळी देशांतील लोकव्यवहाराची जी भाषा ती देशी किंवा देशभाषा असें ह्मणण्यास हरकत नाहीं, हें उघड आहे.

भाषेंतील शब्दांची मूलपीठिका जाणणें, यास शब्दव्युत्पत्ति असें ह्मणतात.

या पुस्तकांत मराठी भाषेंतील संस्कृतापासून निघालेल्या शब्दांची व्युत्पत्ति सांगण्याचा यत्न केला आहे.

मुख्यत्वेंकरून आर्य, यवनी, आणि मराठी किंवा देशी, असे तीन प्रकारचे शब्द मराठींत आहेत. पहिल्या दोहोंत दोन प्रकारचे शब्द येतात.[१]

| आर्य. | यवनी. |
|---|---|
| १ संस्कृत किंवा तत्सम ( संस्कृतासारखे ) | १ आरबी. |
| २ अपभ्रष्ट संस्कृत किंवा तद्भव ( संस्कृतापासून झालेले ) | २ फारसी. |

संस्कृत किंवा तत्सम शब्द.

१. देव, पुरुष, स्त्री, कन्या, पुत्र, वगैरे बहुत शब्द शुद्ध संस्कृत होत. हे शब्द फार असून पुष्कळांस कळण्यासारखे असल्यामुळें या पुस्तकांत दिले नाहींत. हे शब्द मराठी भाषेंत वारंवार येत असल्यामुळें यांचा धात्वर्थ कळला तर चांगलें, परंतु तो सांगण्याचा यत्न केला असतां पुस्तक फार मोठें होईल, ह्मणून सांगितला नाहीं. तो संस्कृतज्ञांस विचारल्यास सहज कळण्यासारखा आहे.

पेशवाईंत संस्कृत भाषेचा प्रसार बहुत झाला, त्या वेळेपासून बहुशः संस्कृत कोशांतील पाहिजे तो शब्द प्रतिष्ठित लो-

---

१. याशिवाय कांहीं कानडी, तेलगु शब्द व अलीकडे पोर्तुगीज्, व इंग्रजी शब्दही येतात. दुड्डाचार्य, अड्ड, हुडकणें वगैरे कानडी आणि वखत्, लेंड, मुंड वगैरे तेलगु शब्द आहेत. पगार, चावी वगैरे पोर्तुगीज् आणि बुक, टेबल वगैरे इंग्रजी शब्द आहेत.

कांच्या मराठी भाषेंत येतो, हें मोरोपंतादिकांची कविता किंवा विद्वान् लोकांचीं भाषणें ऐकिलीं असतां सहज ध्यानांत येईल. यासाठीं संस्कृत धातूंपासून नामें वगैरे होतात त्यांविषयीं कांहीं व्यापक नियम मात्र येथें सांगतों.

१. संस्कृतांत धातूस तृ किंवा इतृ आणि अक प्रत्यय लागून ती क्रिया करणारा अशा अर्थाचे कर्तृवाचक शब्द होतात. जसें–दाता ( देणारा ), भू–भविता (होणारा ), गणक ( मोजणारा ) इत्यादि.

तृ किंवा इतृ प्रत्ययापूर्वीं धातूच्या अंत्य स्वरास आणि उपांत्य ऱ्हस्व स्वरास गुण[1] होतो. जसें:–जि=जेता (जिंकणारा), हु=होता ( होम करणारा ), कृ=कर्ता ( करणारा ) भू–भविता.

अक प्रत्ययापूर्वीं धातूच्या अंत्यस्वरास व उपांत्य अकारास वृद्धि आणि उपांत्य ऱ्हस्व स्वरास गुण होतो. जसें–नी+अक=नै[2]+अक=नाय्+अक=नायक ( नेणारा ). स्तु+ अक= स्तौ+अक=स्ताव्+अक=स्तावक ( स्तुति करणारा ).

कृ+अक=कार्+अक=कारक ( करणारा ).

वह्+अक=वाह्+अक=वाहक ( वाहणारा ).

भिद्+अक=भेद्+अक=भेदक ( फोडणारा ).

मुद्+अक=मोद्+अक=मोदक ( आनंद देणारा ).

नृत्+अक=नर्त्+अक=नर्तक ( नाचणारा ).

क्लृप्+अक=कल्प्+अक=कल्पक ( कल्पना करणारा ).

---

१. इ, उ, ऋ, ऌ, यांस अनुक्रमें ए, ओ, अर्, अल्, असे आदेश झाले ह्मणजे गुण झाला असें ह्मणतात. यांसच ऐ, औ, आर्, आणि आल् असे आदेश झाले आणि अस आा झाला ह्मणजे वृद्धि झाली असें ह्मणतात.

२. संस्कृतांत दोन स्वर एके ठिकाणीं आले ह्मणजे संधि होतो. धातु आणि प्रत्यय, उपसर्ग आणि धातु यांमध्यें संधीचा प्रसंग वारंवार येतो, याकरितां संधींचें कोष्टक उपसर्गांपुढें दिलें आहे.

आकारांत धातूस अकपूर्वी य् लागतो. जसें—

दा + अक=दाय्+अक=दायक ( देणारा ).

२. धातूस त किंवा इत प्रत्यय लागून भूतकालवाचक विशेषणें होतात. जसें—कृत=( केलेला ), नीत=( नेलेला ), शक्=शक्त=( समर्थ झालेला ). निंद् = निंदित.

त प्रत्ययापूर्वी नचा लोप होतो—जसें—मन्=मत, तन्=तत.

धातु ऋकारांत असल्यास ऋच्या जागीं ईर् होऊन तच्या जागीं ण होतो. जसें—तॄ=तीर्ण. जॄ=जीर्ण.

धातु दकारांत असल्यास दकारास नकार होऊन तच्या जागीं न होतो. जसें—भिद्=भिन्न, छिद्=छिन्न.

३. धातूस य, तव्य, ( किंवा इतव्य ) आणि अनीय असे प्रत्यय लागून तें करण्यास योग्य, अशा अर्थाचीं कर्मवाचक विशेषणें होतात. जसें—कृ + य=कार्य ( करण्यास योग्य. ) कृ+तव्य=कर्तव्य. भू—भवितव्य. कृ + अनीय=करणीय.

य, तव्य, आणि अनीय यांच्या पूर्वी धातूच्या अंत्यस्वरास व उपांत्य ऱ्हस्वस्वरास गुण होतो.

नी=नेय, नेतव्य, नयनीय. भिद्=भेद्य, भेत्तव्य, भेदनीय.

यच्या पूर्वी अंत्य उ आणि ऋ व उपांत्य अ यांस वृद्धि होते. जसें—श्रु=श्राव्य ( ऐकण्यास योग्य ). कृ=कार्य. त्यज्=त्याज्य ( टाकण्यास योग्य ).

४. धातूस अ, अन, आणि ति हे प्रत्यय लागून क्रियावाचक नामें होतात. जसें—भिद् + अ=भेद. छिद् + अन=छेदन[1], भू+ ति=भूति, भृ=भार, वस्=वास.

---

१. मराठींत क्रियावाचक धातुसाधित नामें करण्यास धातूस जो णें प्रत्यय लावितात तो अन प्रत्ययाचा अपभ्रंश होय. जसें—गमन=गमणें, यान=जाणें, नमन=नमणें, इत्यादि.

अंत्यस्वरास व उपांत्य अकारास अच्यापूर्वीं कधीं गुण व कधीं वृद्धि होते. जसें– जि=जय, भृ=भार, वस्=वास.

अन याच्यापूर्वीं अंत्य व उपांत्य ऱ्हस्वस्वरास गुण होतो.

अ प्रत्ययांत नामें पुल्लिंगी, ति प्रत्ययांत स्त्रीलिंगी आणि अन प्रत्ययांत नपुंसकलिंगी असतात.

कित्येक धातूंस 'आ' प्रत्यय लागून क्रियावाचक नामें होतात. जसें–शंक्–शंका. स्पृह्–स्पृहा. स्पर्ध्–स्पर्धा.

---

संस्कृत धातूंच्या पूर्वीं लागणारे उपसर्ग या नांवाचे कांहीं एकाक्षरी व कांहीं द्व्यक्षरी असे अव्ययरूप शब्द आहेत. त्यांचा स्वतंत्र प्रयोग नाहीं. संख्येंत शून्यास जशी स्वतंत्र किंमत नाहीं, परंतु ज्या अंकाच्या पुढें शून्य येईल, त्याची किंमत दसपट वाढते, त्याप्रमाणें उपसर्गांस स्वतंत्र अर्थ नाहीं, तरी ते धातूंच्या पूर्वीं लाविल्यानें धातूंचे अगदीं भिन्न भिन्न अर्थ होतात. धातूंच्या पाठीमागें बहुशः एक उपसर्ग असतो, तरी कित्येक वेळा एकापेक्षां अधिकही उपसर्ग धातूच्यामागें लावितात. क्वचित्स्थलीं उपसर्ग पूर्वीं लावूनही धात्वर्थ बदलत नाहीं. एकच उपसर्ग वेगळाल्या धातूंच्या पूर्वीं लागला असतां, वेगळाले अर्थ होतात. तसेंच, एकाच धातूचा वेगळाल्या उपसर्गांच्या योगानें वेगळाला अर्थ होतो. याकरितां अमुक उपसर्गाचा अमुकच अर्थ असें ह्मणतां येत नाहीं. तथापि, पुष्कळ ठिकाणीं येणारे जे अर्थ, ते दिक्प्रदर्शनार्थ त्यांच्यापुढें दिले आहेत. कित्येक उपसर्गांचीं मराठींत रूपांतरें होतात, तीं त्या त्या ठिकाणीं दाखविलीं आहेत.

| उपसर्ग. | अर्थ. | उदाहरण. |
|---|---|---|
| १ अति— | आधिक्य, उल्लंघन. | अतिशय, अतिरिक्त, अतिक्रम. |
| २ अधि— | वर्चस्व— | अधिकार. |
| ३ अनु— | साहित्य— सादृश्य. | अनुसरण, अनुकरण. |
| ४ अप— | न्यूनत्व— | अपकर्ष. |
| ५ अपि— | आवरण— | अपिधान ( आच्छादन ). |
| ६ अभि— | सामीप्य— | अभिगम. |
| ७ अव— | न्यूनत्व— | अवमान. |
| ८ आ— | वैपरीत्य (उलटपणा), गमन (जाणें), आगमन ( येणें ), दान ( देणें ), आदान ( घेणें ). | |
| ९ उत्— | उच्चत्व— | उद्गम, उत्पतन. |
| १० उप— | सान्निध्य— | उपगम. |
| ११ दुर्, १२ दुस् | निंदा, काठिन्य— | दुर्गति, दुर्गम. |
| १३ नि— | राहित्य— | निषेध. |
| १४ निर्, १५ निस् | अभाव— | निःशेष. |
| १६ परा— | वैपरीत्य— | पराजय, पराभव. |
| १७ परि— | आसमंतात्— | परिवार, पर्यटन. |
| १८ प्र— | आधिक्य— | प्रकर्ष, प्रभाव. |
| १९ प्रति— | पुनः— | प्रतिवादी. |
| २० वि— | दूरत्व—आधिक्य— | वियोग, विशेष. |
| २१ सम्— | एकत्र, साधुत्व— | संयोग, संगम, संधि, संस्कार. |
| २२ सु— | सौख्य— | सुगम, सुलभ, सुकर. |

# स्वरसंधींचें कोष्टक

**पुढें येणारे स्वर.**

| मागील स्वर. | अ | आ | इ | ई | उ | ऊ | ऋ | ॠ | ऌ | ए | ऐ | ओ | औ |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| अ आ | आ | | ए | | ओ | | अर् | | अल् | ऐ | | औ | |
| इ ई | य | या | ई | | यु | यू | यृ | यॄ | यॢ | ये | यै | यो | यौ |
| उ ऊ | व | वा | वि | वी | ऊ | | वृ | वॄ | वॢ | वे | वै | वो | वौ |
| ऋ ॠ | र | रा | रि | री | रु | रू | ॠ | | | रे | रै | रो | रौ |
| ऌ | ल | ला | लि | ली | लु | लू | | | | ले | लै | लो | लौ |
| ए | अय | अया | अयि | अयी | अयु | अयू | अयृ | अयॄ | अयॢ | अये | अयै | अयो | अयौ |
| ऐ | आय | आया | आयि | आयी | आयु | आयू | आयृ | आयॄ | आयॢ | आये | आयै | आयो | आयौ |
| ओ | अव | अवा | अवि | अवी | अवु | अवू | अवृ | अवॄ | अवॢ | अवे | अवै | अवो | अवौ |
| औ | आव | आवा | आवि | आवी | आवु | आवू | आवृ | आवॄ | आवॢ | आवे | आवै | आवो | आवौ |

**मागील स्वर.**

१. बाजूच्या उभ्या ओळींतील कोणत्याही स्वरापुढें वरील आडव्या ओळींतील कोणताही स्वर आल्यास, त्या दोहोंच्या समोरील ओळींत दिलेलें रूप दोघांच्या जागीं होतें असें समजावें.

अपभ्रष्ट संस्कृत शब्द मराठी भाषेंत आहेत त्यांचें मूळ या पुस्तकांत सांगितलें आहे.

बाप, धाकटा, लेंकरूं, झाड, वगैरे मराठी भाषेंत शब्द आहेत; त्यांचें मूळ दुसऱ्या भाषांत सांपडण्यासारखें नसल्यामुळें, त्यांस देशी किंवा मराठी असें नांव दिलें आहे. हेमचंद्राचा देशीनाममाला या नांवाचा कोश आहे, त्यांत, व मृच्छकटिकादि नाटकांत, तत्सम किंवा तद्भव नव्हे, असे हिंदुस्तानी, गुजराथी, मराठी, वगैरे देशभाषांत येणारे अनेक शब्द सांपडतात, त्यांपैकीं मराठींत येणाऱ्या मुख्य मुख्य शब्दांची यादी पुढें दिली आहे.

### यवनी.

जे आरबी, फारसी, शब्द मराठी भाषेंत प्रसिद्ध आहेत, त्यांच्या यादी पुस्तकाच्या शेवटीं दिल्या आहेत.

### तद्भव किंवा—अपभ्रष्ट संस्कृत शब्द.

संस्कृत शब्दांचे अपभ्रंश होऊन प्राकृत शब्द होतात, त्यांस तद्भव ( संस्कृतापासून झालेले ) असें ह्मणतात. अपभ्रंश दोन प्रकारचे आहेत. रूपापभ्रंश आणि रूपार्थापभ्रंश. संस्कृत शब्दाचे मराठी शब्द होतांना अपभ्रंश एक वेळा किंवा एकापेक्षां अधिक वेळाही होतो. जसें—मल=मळ, स्थल=स्थळ. अशा प्रकारच्या शब्दांत एकवारच अपभ्रंश झालेला आहे.

| परंतु— | संस्कृत. | प्राकृत. | मराठी. |
|---|---|---|---|
| | आर्य. | अज्ज. | आजा. |

अशा प्रकारच्या शब्दांत दोनदा अपभ्रंश झालेला आहे. संस्कृतापासून अपभ्रंश होऊन प्राकृतांत येऊन मग जे मराठींत येतात, ते जुने तद्भव, व साक्षात् संस्कृतापासून मराठींत येतात, ते नवे तद्भव होत. स्थलसंकोचामुळें सर्व अपभ्रंश दाखविले नाहींत; कांहीं ठिकाणीं मात्र दाखविले आहेत.

जेथें अर्थ कायम राहून शब्दाचें रूप मात्र बदलतें, तेथें

रूपापभ्रंश होय. जसें—अर्पण=ओपणें, अमंगल=ओंगळ, इ-क्षु=ऊंस, इत्यादि.

जेथें मूळशब्दाचें रूप पालटून अर्थही बदलतो, तेथें रूपार्थापभ्रंश होय. जसें—अयि=आई, आचमन=आंचवणें, इत्यादि.

## रूपापभ्रंश.

वर्णभेद, वर्णलोप, वर्णवृद्धि, आणि वर्णविपर्यय, अशा चार प्रकारांनीं शब्दाचे अपभ्रंश होतात.

वर्णभेद.—कार्य=कज्ज=काज, स्तंभ=खंबो=खांब, बल=बळ, रात्री=रात्र इ०.

वर्णलोप.—अरण्य=रण्ण=रान, बदर=बोर, आलवाल=अळें, उपवास=उपास इ०.

वर्णवृद्धि.—आम्ल=आंबट, तिक्त=तिखट, हनु=हनुवटी, पीत=पिवळा इ०.

वर्णविपर्यय.—तिलक=टिकला, उत्तल=उलथा, वाचाल=चावट इत्यादि.

संस्कृत शब्द प्राकृत भाषेंत येतांना जे अपभ्रंश होतात,

१. एका भाषेचें रूपांतर होऊन दुसरी भाषा होऊं लागली ह्मणजेच शब्दांचा रूपभेद, किंवा अर्थभेद होतो असें नाहीं. एकच भाषा पुष्कळ काळ व्यवहारांत असल्यास तिच्या कित्येक शब्दांचें रूपांतर व अर्थांतर होतें. जसें—देवेभिः, पन्थाः, इत्यादिक वैदिक शब्दांचीं कालांतरानें देवैः, पन्थानः, इत्यादिक रूपांतरें झालीं. अशींच अर्थांतराचींही पुष्कळ उदाहरणें आहेत. तसेंच वर्णभेदादिक जे अपभ्रंशाचे प्रकार ते शुद्ध संस्कृत शब्दांत सुद्धां क्वचित् आढळतात. जसें, वर्णवृद्धि होऊन हस् धातूपासून हंस शब्द झाला. वर्णविपर्यय होऊन हिंस् धातूपासून सिंह शब्द झाला. गूढात्मा याचा वर्णभेद होऊन गुढात्मा असें झालें, आणि पृषदुदर यांतील दकाराचा लोप होऊन पृषोदर असें झालें. एकाच भाषेच्या शब्दांत कालांतरानें रूपभेद होतो, परंतु त्यास अपभ्रंश असें ह्मणत नाहींत. एका भाषेंत रूपांतर किंवा अर्थांतर होऊन दुसऱ्या भाषेचे शब्द उच्चारणें यास अपभ्रंश असें ह्मणतात, व त्या शब्दांस अपभ्रष्ट शब्द असें ह्मणतात.

त्यांविषयीं वररुचि आणि हेमचंद्र यांच्या व्याकरणांत जे नियम सांगितले आहेत त्यांतील कांहीं सांगतों.

१. कित्येक शब्दांच्या अकारास इकार होतो. जसें—पक्क=पिक्क=पिका, अंगार=इंगालो=इंगळा.

२. शय्यादि शब्दाच्या अकारास ए होतो. जसें—शय्या=शेज्जा=शेज, त्रयोदश=तेरह=तेरा, वल्ली=वेल्ली=वेल.

३. पिण्डादि शब्दांत इस ए होतो. जसें—पिण्ड=पेण्ड=पेंड, सिंदुर=सेंदूर=शेंदूर.

४. कित्येक शब्दांत उकारास ओ होतो. जसें—तुण्ड=तोण्ड=तोंड, मुक्ता=मोत्ता=मोतीं, पुष्कर=पोक्खर=पोंखर.

५. कित्येक शब्दांत व्यंजनाचा लोप होतो. जसें—सूची=सुई, भूमि=भुई.

६. संस्कृत शब्दामध्यें ख, घ, थ, ध, भ, असंयुक्त असल्यास त्यांस ह होतो. जसें—बधिर=बहिरा, प्रभात=पहांट, पृथुक=पोहा, प्राघुणक=पाहुणा, दधि=दहिं.

७. हरिद्रादि शब्दांच्या रस ल होतो. जसें—हरिद्रा=हल्दा=हळद, अंगार=इंगलो=इंगळा.

८. शब्दाच्या आद्य यकारास ज होतो. जसें—यत्र=जेथ्थ=जेथें, या=जाणें.

९. जोडाक्षरांतील आद्य, क, ड, ग, त, द, प, ष, र, इत्यादिकांच्या जागीं प्राकृतांत पुढील व्यंजनांचा आदेश होतो, हे शब्द मराठींत येतांना पहिल्या व्यंजनांचा लोप होऊन मागील स्वर दीर्घ होतो. जसें—भक्त=भत्त=भात, सिक्थ=सित्थओ=शीत, मुद्ग=मुग्ग=मूग, हस्त=हत्थ=हात, कार्य=कज्ज=काज, कर्म=कम्म=काम, पर्ण=पण्ण=पान, सर्प=सप्प=साप, सप्त=सात.

१०. जोडाक्षरांतील अंत्य म, न, य, यांचा लोप होतो. जसें—रश्मि=रसि=रशी (दोरी), युग्म=युग=जुग, नग्न=नंगा, योग्य=जोगा.

११. शब्दांमध्यें स्वरापुढें पकार आल्यास त्यास व होतो. जसें—कच्छप=कांसव, सपत्नी=सवत.

१२. ऋकारांत संस्कृत धातूच्या अंत्य ऋकारास अर् आदेश होतो. जसें—कृ=कर्, भृ=भर्, मृ=मर्, सृ=सर्, तृ=तर्, इत्यादि.

१३. पत्, सद् इत्यादि धातूंच्या अंत्य व्यंजनास ड आदेश होतो. जसें—पडणें, सडणें इत्यादि.

१४. व्यंजनांत संस्कृत धातु प्राकृतांत येतांना अकारांत होतात. जसें—वद्=वद, भ्रम्=भ्रम.

१५. संस्कृत धातूंच्या अंत्य दकारास कधीं कधीं ज होतो. जसें—खिद्=खिजणें, मद्=माजणें.

याशिवाय कांहीं नियम त्या त्या उदाहरणाखालीं दिले आहेत.

---

अल्पवर्ण भेद झाल्यामुळें संस्कृतांतील मूलरूपांत फार बदल न होतां, जे नवीन तद्भव शब्द मराठी भाषेंत येतात, त्यांविषयीं कांहीं नियम सांगतों.

१. संस्कृत अकारांत पुल्लिंगी शब्द मराठींत बहुशः तसेच राहतात. परंतु कित्येकांस मराठींत आकारांत रूप प्राप्त होतें. जसें—शिष्य=शिष्या, काण=काणा, घोट=घोडा[1], इत्यादि.

[1] घोडा इत्यादि शब्दांच्या व्युत्पत्तीविषयीं कित्येक विद्वानांचा असा तर्क आहे कीं, मूलशब्द घोटक याचा प्राकृतांत घोडअ असा अपभ्रंश होऊन मराठींत येतांना घोड शब्दाचा अंत्य अकार व क यांतील उरलेला अकार यांचा संधि होऊन घोडा असा शब्द झाला. संस्कृतांत बहुतेक नामांस स्वार्थी क प्रत्यय लागत असल्यामुळें कित्येक शब्दांविषयीं असा तर्क करणें सयुक्तिक दिसलें, तरी मराठींत सर्व आकारांत शब्द अशाच रीतीनें झाले आहेत असें ह्मणतां येणार नाहीं. यापेक्षां पुढील तर्क विशेष सयुक्तिक दिसतो तो हा कीं, संस्कृतांत अकारांत पुल्लिंगी शब्दास प्रथमेच्या एकवचनीं विसर्ग लागतो, त्याचा प्राकृतांत ओ होतो. (वररुचि ५—१) जसें—वत्सः=वत्सो, स्तंभः=खंबो.* ह्या ओस मराठींत ये-

* मराठी व्याकरण निबंध ५ वा. पुणें शाळापत्रक पुस्तक ५ अंक ५.

२. जेथें अकारांत शब्दांचें उपांत्य व्यंजन 'ल' असतो तेथें लस ळ होऊन मराठींत शब्द होतात. जसें—बल=बळ. स्थूल=स्थूळ, इत्यादि.

३. कित्येक आकारांत व इकारांत संस्कृत शब्दांच्या अंत्य ईस व आस अ आदेश होऊन मराठी शब्द होतात. जसें—धारा=धार, शिरा=शीर, रीति=रीत, रात्रि=रात्र, इत्यादि.

४. ऋकारांत व नकारांत शब्दांचें संस्कृतांत प्रथमेचें एकवचन असतें तेंच मराठींत मूलरूप होतें. जसें—कर्तृ=कर्ता, दातृ=दाता, करिन्=करी, वैरिन्=वैरी, आत्मन्=आत्मा, राजन्=राजा, नामन्=नाम, कर्मन्=कर्म, इत्यादि.

५. तें ज्यास आहे अशा अर्थी मत् किंवा वत् प्रत्यय लागून

---

तांना आकार होतो; बच्चा, खांबा इत्यादि. कोंकणीभाषेंत कित्येक शब्दरूपांचें प्राकृत भाषेशीं देशावरील मराठी भाषेंतील शब्दांपेक्षां साम्य अधिक आहे, त्यामुळें कोंकणीभाषेंत वर सांगितलेल्या शब्दांत प्राकृतांतील ओकारच राहिला आहे. जसें—घोडो, खांबो, बच्चो, इत्यादि. गुजराथींतही घोडो असेंच रूप होतें. मूळचा कप्रत्ययांतील अकार प्राकृतांत राहतो त्याचा मूळशब्दांतील अंत्य अकाराशीं संधि होऊन मराठींत आकारांत शब्द झाले असें ह्मणण्यास आणखी एक प्रतिबंध आहे तो असा कीं, संस्कृतांत अकारांत शब्द पुल्लिंगी असो अथवा नपुंसकलिंगी असो दोहोंसही स्वार्थी क प्रत्यय लागण्याचा नियम एकच आहे. नपुंसकलिंगी शब्दांतील क प्रत्ययाच्या अकाराशीं संधि होऊन मराठींत आलेले आकारांत नपुंसकलिंगी शब्द आढळत नाहींत, यावरून संस्कृत पुल्लिंगी नामांच्या विसर्गांत प्रथमेच्या एकवचनाचा अपभ्रंश होऊन मराठी आकारांत पुल्लिंगी नामें होतात हेंच मानणें सयुक्तिक आहे असें सिद्ध होतें.

१. अकारांत स्त्रीलिंगी शब्दांचीं सामान्य रूपें ईकारांत आणि एकारांत अशीं दोन प्रकारचीं होतात. वरील नियमावरून त्यांविषयीं असा नियम दिसतो कीं, जे शब्द मूल संस्कृत इकारांत शब्दांपासून अकारांत झाले आहेत त्यांचें सामान्यरूप ईकारांत होतें, व जे आकारांत शब्दांपासून अकारांत झाले आहेत त्यांचें सामान्यरूप एकारांत होतें. जसें—रात्र=रात्री, धार=धारे, इत्यादि.

जीं संस्कृतांत विशेषणें होतात, त्यांच्या प्रथमेचें एकवचन तेंच मराठींत मूलरूप होतें. जसें—बुद्धिमान्, श्रीमान्, धनवान्[1], इत्यादि.

६. सकारांत पुल्लिंगी शब्दाचा शेवटील स् जाऊन मागल्या अकारास आकार होऊन मराठींत शब्द होतात. जसें—चंद्रमस्=चंद्रमा. परंतु सकारांत शब्द मूळचा नपुंसकलिंगी असला तर त्याचा सकार मात्र नाहींसा होतो. जसें—मनस्=मन, पयस्= पय, इत्यादि.

७. ज्यांच्या आरंभीं तालव्य वर्ण असतो असे कित्येक संस्कृत शब्द मराठींत येतांना त्यांच्या तालव्य व्यंजनाचा दंततालव्य उच्चार होतो. जसें—चोर=चोर, जड=जड, इत्यादि.

## व्युत्पत्तिप्रदीप.

**अंक्** (खुणा करणें) आंखणें, अंक, आंकडा, आंखणी, अंकुर=आंकुर, अंकित[2].

**अक्का** (वडील बहिणीचें वगैरे सन्मानार्थी नांव.) आका, आकाबाई.

**अंग** आंग, आंगडें, अंगना[3].

**अंगन** आंगण, आंगणें.

**अंगार** (निखारा) आंगारीं[4] इंगळ (प्रा० इंगालो.)

**अंगुल** (बोट) आंगूळ, कर (हात)+अंगुली=करंगळी.

---

१. संस्कृतांत अशा प्रकारचीं विशेषणें स्त्रीलिंगी असल्यास त्यांचीं रूपें धनवती, बुद्धिमती अशीं होतात; आणि नपुंसकलिंगी असल्यास धनवत्, बुद्धिमत् अशींच राहतात. परंतु मराठींत कित्येक विशेषणांचीं रूपें लिंगभेदानें पालटत नाहींत, त्याप्रमाणें धनवान् इत्यादि विशेषणांचें रूप सर्वलिंगी सारखेंच योजितात. जसें—धनवान् पुरुष, धनवान् बायको, धनवान् घराणें इत्यादि. २. अंकित म्हणजे खुणा केलेला असा अर्थ आहे. राजादिकांचा सेवक असला म्हणजे त्याच्या अंगावर कांहीं तरी सेवकपणाचें चिन्ह असतें त्यावरून मराठींत अंकित म्हणजे सेवक असा अर्थ झाला. तो त्याचा अंकित आहे म्हणजे त्याचा हुकूम मानणारा आहे असें समजतात. ३. अंगशब्दास प्राशस्त्यबोधक 'न' प्रत्यय लागून 'अंगना' हा शब्द झाला आहे. याचा अर्थ 'सुंदर स्त्री' असा आहे. ४. देवापुढें निखाऱ्यावर धूप जाळितात त्या संबंधानें हा शब्द झाला आहे. ५. नियम १ पान ११.

**अंगुष्ठ** आंगठा, आंगठी.
**अग्नि** (विस्तव)आग, आगटी.
**अग्र** (टोंक) अगरडें, अघाडी.
**अंचल** ( शेवट, पदर ) आंचळ्या, आंचळ.
**अंज्** (माखणें) अंजन, अभ्यंग, ओंगण, आज्य (तूप), निरंजन ( साधु—ज्याला अंजन ह्मणजे . अज्ञानमल नाहीं तो.) व्यंजन (दुसऱ्या वस्तूशीं मिसळतें तें).
**अंजलि** ओंजळ.
**अटरुष** अडूळसा.
**अंड** अंडें, आंडें.
**अड्** (पराभव करणें) अडणें, अडणी, आडाणा ( दाराचा आडसर).
**अत्तिका** आत्या (अत्तिका ह्मणजे वडील बहीण असें असून प्राकृतांत बापाची बहीण असा अर्थ झाला आहे).
**अतिथि** ( पाहुणा ) अतीत.
**अत्र** (प्रा० एथ्थ[1]) एथें, येथें.
**अंत्र** आंतडें, आंतडी.
**अद्य** ( प्रा० अज्जं[2] ) आज.
**अंध** आंधळा, अंधकार=अंधार.
**अनंतर** नंतर.
**अन्य** (दुसरा )आन, आणि, अन्यक=आणिक.
**अभ्र** ( ढग ) आभाळ,अभ्रा[3].
**अमावास्या**[4] ( कृष्णपक्षाची शेवटची तिथि ) अंवस.
**अमुक** अमूक, अमका.
**अय्** ( जाणें ) अयन. दक्षिणायन[5], उत्तरायण. पलायन[6]=पळणें.
**अयि**[7] आई.

---

१. नियम २ पान ११. २. नियम ९ पान १२. ३. अभ्र आकाशास आच्छादितें, त्यावरून आच्छादनास अभ्रा असें नांव पडलें. जसें—छत्रीचा अभ्रा. ४. अमा=एके ठिकाणीं. वस्=रहाणें, ज्या दिवशीं चंद्र सूर्य एके ठिकाणीं आकाशांत येतात ती तिथि. ५. दक्षिणायन ह्मणजे दक्षिणेकडे जाणें, उत्तरायण ह्मणजे उत्तरेकडे जाणें. एका वर्षांत सूर्य विषुववृत्ताच्या दक्षिणेस सहा महिने व उत्तरेस सहा महिने जातो त्यावरून हे शब्द झाले आहेत. ६. संस्कृतांत परा या उपसर्गाचें रूप अय धातूच्या पूर्वी पला असें होतें, त्यावरून पलायते=पळतो, पलायन=पळणें, अशीं रूपें होतात. ७. हें ममतेनें हाक मारण्याचें अव्यय आहे. संस्कृतांत 'अयि शकुंतले' ह्मणजे हे शकुंतले.

**अरघट्ट** रहाट.[1]
**अरण्य** रान.[2]
**अर्गला** आगळ.
**अर्घ्य** (उदकांत गंध पुष्प घालून देवास अर्पण करतात तें) अर्घ्या=अर्घ्य देण्याचें पात्र.
**अर्च्** (पूजाकरणें) अर्चन, अर्चिणें, अर्चा, अर्च्य (पूज्य).
**अर्चिस्** (ज्वाळा) आंच.
**अर्थ्** (मागणें) अर्थ, प्रार्थना, प्रार्थिणें.
**अर्ध** अर्धे, अर्धोली, अर्धेली, अर्धेला, अर्धेल, अर्धक=अर्धुक. अर्धशीर्ष (अर्धे मस्तक) अर्धशिशि (अर्धे कपाळ दुखतें त्या रोगास ह्मणतात.)
**अर्प्**[3] (देणें) अर्पिणें. अर्पण=ओपणें. समर्पण=सोपणें
**अलक्त** अलिता (रंगविशेष).
**अलस**[4](मंद) आळस, आळशी.
**अवदशा** (वाईट स्थिति) अवदसा.
**अवधीर** (तिरस्कार) प्रा० (अवहीर) अव्हेर, अव्हेरणें.
**अश्** (खाणें) निरशन, अपोशन=अपोष्णी, अत्याशी=अधाशी. अनशें (ज्यानें भक्षण केलें नाहीं असें पोट).
**अंश** (धान्यादिकांचा अंश) आंशीं.
**अश्रु** (डोळयांतील पाणी) असूं=(प्रा० असूं) आंसवें.
**अष्टन्** आठ, आठवा[5]=अष्टमी=आठवी (तिथि).
**अस्थि**(बीज) अठळी, आठीळी.

---

१. रहाट हें चक्रच आहे. चाकाचा तुंबा आणि धांव यांमध्यें बसविलेल्या ज्या पाकळ्या त्यांस संस्कृतांत ‘अर’ असें ह्मणतात. अरांनीं घडविलेला ह्मणून अरघट्ट. २. अरण्य शब्दाच्या अचा लोप होतो. वररुचि १—४. ३. अर्प् हें संस्कृतांत ‘ऋ’ (जाणें) असा धातु आहे त्याचें प्रयोजकरूप आहे. याचा अर्थ जाविवणें असा आहे. देवास पुष्प अर्पिणें ह्मणजे आपल्याजवळ आहे त्यास देवाकडे जाववणें. याच ‘ऋ’ धातूपासून ‘ऋण’ हा शब्द झाला. याचा अर्थ दुसऱ्याकडे गेलेलें धन. ४. हें मूळचें विशेषण, त्यापासून भाववाचक नाम आलस्य, त्यापासून प्राकृतांत आळस हा शब्द निघून पुन: त्यापासून आळशी असें विशेषण झालें. ५. संस्कृतांतील क्रमसंख्यावाचक विशेषणाचा प्रत्यय ‘म’ यास मराठींत व होतो. जसें—पंचम=पांचवा, सप्तम=सातवा, नवम=नववा.

**अस्** असणें, अस्ति=प्रा० अत्थि, आथि[1]=आहे, अस्मि=प्रा० अह्मि=आहें.

**अस्** (टाकणें, फेकणें) अस्त, अस्त्र, व्यसन=वासणें, संन्यास[2], संन्यासी, समास[3], पर्यस्त(प्रा० पल्लुथ) पालट, पालटणें, पालथें.

**अस्मत्** प्रा० आह्मे=आह्मी, मज्झ=माझें, मं=मीं[4].

**अक्ष**[5] ( कणा ) आंस, आंख, ( गाडीचा. )

**अक्षि** ( डोळा ) आंख.

**अक्षोटक** अक्रोड.

**आकर** ( खाण ) आगर —मिठागर.

**आकर्णन** ऐकणें.

**आततायिन्** ( त्रागा करणारा) आतत्याई, आतत्यायी.

**आत्मन्** ( प्रा० अप्पा ) आप ( आप पर जया नाहीं ) आर्पण[6]. आत्मीय ( प्रा० अपुल्लो ) आपला.

**आत्यर्थ** ( पुष्कळ ) प्रा० अच्चठ=अचाट.

**आदि** आधीं.

**आंदोल** ( झोंके घेणें ) आंदुळणें, हांदुळणें, हिंदुळा.

**आप्** ( मिळणें ) आप्त, प्रापन=पावणें, प्राप्ति=पावती, समापन=संपविणें, व्यापन=व्यापणें.

**आपत्ति** आप्ति, आपदा.

**आम** ( अपक्व, हिरवें,) आंब[7].

**आम्र** आंबा.

**आमंत्रण** ( बोलावणें ) आंवतणें.

**आमलक** आंवळा.

**आम्रात** आंबाडी.

**आम्ल** आंबट, आंबणें, आंब ( हरभऱ्यांची ), आंवली, ( चिंच ), आमटी.

**आरा** आरी ( चांभाराची ).

---

१. ज्ञानेश्वरींत आथी याचा प्रयोग आढळतो. २. विषयोपभोगाचा त्याग. ३. ज्यांत शब्द एके ठिकाणीं जुळतात तो. ४. मं हें प्राकृतांत द्वितीयेचें एकवचनीं रूप आहे त्यापासून प्रथमेचें एकवचन मी हें झालें आहे. ५. संस्कृत शब्दांतील क्ष आणि छ यांस मराठींत स होतो. जसें—इक्षु=ऊंस, कुक्षि=कूस, पृच्छ=पूस, तुच्छ, तूस. ६. वररुची ५—४५. ७. संस्कृत शब्दांत म असल्यास मागील स्वर अनुनासिक होऊन मच्या जागीं व आदेश होतो. जसें—आमलक=आंवळा, कोमल=कोंवळा, श्यामल=सांवळा, नाम=नांव, ग्राम=गांव इ०.

आर्द्र[1] ( प्रा० ओल्लं ) ओलें.
आर्द्रक (प्रा० अल्लं) आलें.
आर्य[2] ( श्रेष्ठ ) प्रा० अज्ज, आजा, आजी. आर्यालय =आजोळ.
आयुष्य आउक्ष, शतायुष= [3]सताउक्ष.
आलवाल अळें, आळें, अळी.
आवली[4] (प्रा० ओली) ओळ.
आशा ( इच्छा ) आस.
आश्रय आस्रा, आसरा.
इ ( जाणें ) येणें. सम+आ+इत=समेत=समेट. प्र+इत =प्रेत. अनु+इत=आन्वित. उप+इत=उपेत. दुरित, अपेत, उदय—उद्यां.
इतर ऐर, एरू.
इयत् इतका—की—कें. इयत्ता ( इतकेपणा ) यत्ता.
इष् (इच्छिणें) इच्छा, इच्छिणें.
इष्टका ईट, वीट, विटकर, इष्टकालय=इटाळें.
इक्षु ( प्रा० [6]उच्छू, ) ऊंस.
ईषा ईस (नांगराची) इसाड.
ईक्ष् ( पहाणें ) परीक्षा=पारख, निरीक्षण=निरखणें.
ईदृश (प्रा० एरिसो )=ऐसा असा.
उग्र(भयंकर)उग्रट, उगीर.
उच्च उंच, उंची.
उत्संग ( मांडी ) ओसंग.
उदुंबर[7] उंबर.
उंदरु उंदीर.
उद्धत उद्धट.
उद्यम ( उद्योग ) उदीम, उदमी.
उपरि ( प्रा० अवरि ) वर, उपऱ्या.
उपवास उपास.
उपाध्याय[8] उपाध्या.

---

१. हेमचंद्र ८—१—८२. २. नियम ९ पान ११. ३. हा शब्द बहुशः वायकांच्या भाषणांत येतो. ४. हेमचंद्र ८—१—८३. ५. नियम ३ पान ११. ६. व० १—१५ इक्षु आणि वृश्चिक यांच्या इकारास उ होतो. ७. वररुचि ४—२ उदुंबर शब्दांतील 'दु' याचा लोप होतो. ८. उपेत्य यस्मात् अधीते स उपाध्यायः हा० विद्यार्थी ज्याच्या घरीं जाऊन यथाशास्त्र अध्ययन करितो तो उपाध्याय. असा हा शब्द प्रतिष्ठाद्योतक होता परंतु ती स्थिति नाहींशी झाल्यामुळें शब्दांतही प्रतिष्ठा द्योतित होत नाहीं.

उपाय उपांव.[1]

उरस् ऊर, उरस्फोट=उरफोड, औरस.

उलूखल[2] उखळ, उखळी.

उष् (जाळणें) उष्मन् (प्रा० उन्ह, ऊन, उष्णोष्ण=उन्हून, कवोष्ण=कोंवट, ऊष्मा=ऊब, उवारा, ऊष्मालय=उन्हाळा.

उक्ष् (शिंपटणें) प्रोक्षण, प्रोक्षित, प्रोक्षिणें, अवोक्षण.

उषर उखर.

उष्ट्र उंट.

ऊन् (कमी होणें) उणा, उणीव, पादोन=पाऊण, एक+ऊन=एकोन. एकोनविंशति=एकुणवीस किंवा एकोणीस.

ऊर्ज् (बळकट करणें) उजरणें, ऊर्जा.

ऊर्ण् (आच्छादन करणें) ऊर्णा (लोंकर) ऊर्णायुः (ज्यास लोंकर आहे तो) लुर्णुस.

ऋजु (सरळ) उजू,[3] आर्जव (सरळपणा).[4]

ऋण (कर्ज, प्रा० रिण,) रीण, रिणको.

ऋक्ष (आस्वल) रीस.

एकत्र एकंदर.

एकादश=(प्रा०) एआरह=अकरा.[5][6]

---

१. तत्सम किंवा तद्भव शब्दांतील यस कधीं कधीं व होतो. राज=राय=राव, पाद=पाय=पाव, उपाय=उपाव; जरि तुज व्हावा देव तरि हा सुलभ उपाव. तुकाराम. २. व० १—२१. ३. ऋजु याचा मूलार्थ उजू यामध्यें आला आहे परंतु आर्जव ह्मणजे सरळपणा याचा मराठींत वेगळा अर्थ झाला आहे. प्राकृत आर्जव शब्दांत निंदा ध्वनित होते. आर्जवी मनुष्य ह्मणजे लवचीक, लवणारा, ह्मणजे लोक ह्मणतील त्यास होस हो ह्मणून खुशामत करून आपलें काम करून घेणारास आर्जवी ह्मणतात. ४. व० १—३०. ५. संख्यावाचक शब्दांतील दकारास र आदेश होतो. वररुचि २—१४. एकादश=अकरा, द्वादश=बारा, त्रयोदश=तेरा, पंचदश=पंधरा, सप्तदश=सतरा, अष्टादश=अठरा. ६. भाषेंतील शब्द हीं मनुष्यांच्या विचारांचीं चित्रें आहेत, असें ह्मणण्यास हरकत नाहीं. देशाची किंवा राष्ट्राची पूर्व स्थिति कळण्यास इतिहासादिक साधनें नसलीं तर कितीएक वेळा भाषेंतील शब्दांत इतिहासाचें बीज असतें त्यापासून कितीएक गोष्टींची माहिती होते. यास मराठींतील संख्यावाचक शब्द हें एक चांगलें उदाहरण आहे. संस्कृतांत मुख्य संख्या-

| | |
|---|---|
| एडक एडका, येडका. | एला वेलदोडा, वेळा. |
| एतावत् एवढा–ढी–ढें. | ओलंड् (फेकणें) ओलांडणें. |

वाचक शब्द एक (१), द्वि (२), त्रि (३), चतुर् (४), पंचन् (५), षष् (६), सप्तन् (७), अष्टन् (८), नवन् (९), दशन् (१०), विंशति (२०), त्रिंशत् (३०), चत्वारिंशत् (४०), पंचाशत् (५०), षष्टि (६०), सप्तति (७०), अशीति (८०), नवति (९०), शत (१००), हे आहेत. अकरांपासून शंभरांपर्यंत प्रत्येक दोन दशकांतील संख्या पहिल्या दशकाच्या मागें एक, द्वि, वगैरे लागून बेरजेनें करितात. जसें—एक अधिक दश=एकादश, एक आणि विंशति=एकविंशति. परंतु नववी संख्या पुढल्या दशकांत एक उणा करून वजाबाकीनें करण्याची चाल आहे, एक–ऊन–विंशति=एकोनविंशति. या संख्या करितांना एक, द्वि, हे शब्द मागें लावण्याचें कारण असें कीं, प्राचीन काळच्या आपल्या देशांतील गणितशास्त्रकारांची उजवेकडून डावेकडे संख्या मांडीत जाण्याची चाल असे. जसें—एकवीस २१, तीनशेंएकवीस ३२१ हे पूर्वी प्रमाणें अनुक्रमें बारा आणि एकशें तेवीस होत. मराठींत संख्यावाचक शब्द संस्कृत संख्यावाचकांचे अपभ्रंश आहेत ह्मणून पूर्वीप्रमाणें प्रथम लहान संख्या नंतर मग मोठी संख्या ह्मणण्याची चाल आहे. परंतु आलीकडे डावीकडून उजवीकडे संख्या मांडण्याची चाल पडून पहिल्यानें मोठी संख्या मांडून मग लहान संख्या मांडावयाची चाल परकीय लोकांपासून आलेली आहे. आपण एकवीस ह्मणजे एक आणि वीस असें ह्मणतों तेथें इंग्रजी वगैरे दुसऱ्या भाषेंत मोठी संख्या आधीं ह्मणून मग लहान ह्मणावयाची ह्मणून वीस २० आणि १ (Twenty one) असें ह्मणतात. आपण ही चाल घेतल्यामुळें शंभरांपुढें याप्रमाणें मोजतों. जसें—एकोत्तरशत असें जेथें संस्कृतांत ह्मणतात तेथें आपण मराठींत एकशें एक असें ह्मणतों. यावरून एकशें पंचवीस १२५ अशा संख्यांत आपली पूर्वीची चाल व नवीन घेतलेली चाल यांची मिसळ होऊन भेंडगुजरी झाली आहे. एकशें पंचवीस या ठिकाणीं इंग्रजीत (one hundred and twenty-five) असें ह्मणतात; परंतु आपण एकशें पंचवीस संख्येंत पहिल्यानें शंभर ही मोठी संख्या ह्मणतों नंतर शेवटली पांच ही ह्मणतों नंतर मधली वीस ही ह्मणतों असा प्रकार झाला आहे. तथापि आपल्या मराठी शंभरांपर्यंत संख्यावाचक शब्दांत पूर्वींच्या संख्या मांडण्याच्या चालीचें बीज राहिलें आहे तें कधींहि नाहींसें व्हावयाचें नाहीं.

**ओष्ठ** ओंठ, ओठाळी.
**औषधि** (वनस्पति) औषध =ओखद.
**कंकण** कांकण ( बांगडी ).
**कंकाल** ( हाडांचा सांपळा ) कंगोल.
**कंगु** ( एक प्रकारचें धान्य ) कांग.
**कच्चर** ( मलीन ) कचरा ( केर ).
**कंचुकी** ( चोळी ) कांचोळी.
**कच्छप** कांसव, ( प्रा० कासवो ).
**कज्जल** काजळ, काजळी.
**कट्** (आंवरणें), कटक, कट्टा, कड, कडा, कडी, कडें.
**कंटक** कांटा.
**कटाह** कढई.
**कटि** ( कंबर ), कडेवर, कटिदोरक—कडदोरा.
**कटु** कडु.
**कटुकी** कुटकी.
**कठिन** कठिण.
**कंठ्** ( काळजी करणें ), उत्कंठा, कंठणें, कांठणें.
**कंठ** ( गळा ) कंठी, कंठा, कांठ.
**कंड्** ( मोडणें ), कंडन= कांडणें.
**कंडू** ( खाज ). कंड, खांडुक.[1]
**कण** ( अंश ), कणी, कण्या, कणीक, कणेरी.
**कणिश** कणीस.
**कथ्** ( सांगणें ), कथा, कथन=काहणी.
**कंथा** ( दुलई ), कंथा, कांथडी=गोधडी.
**कंद** कांदा.
**कदंब** ( वृक्षविशेष ) कळंब.
**कदर्य** कद्रु.
**कदली**[2] ( प्रा० केली ), केळ, केळी.
**कदा** कधीं.
**कद्रु** ( पिंगट रंग ), कंदी.
**कंप्** कांप, कांपणें, थरकांप, कांपरा.
**कपर्दिक** कवडी, कवडा, ( मोठी कवडी ).
**कपाट** ( दार ) कवाड, कवाडी.
**कपित्थ** (वृक्षविशेष). (प्राकृत कविट्ठ). कवठ, कौठ.
**कंबल** कांबळा, कांबळें, कांबळी.

१. खावयास न मिळून कृश झालेल्यास ह्मणतात. २. हेमचंद्र ८—१—१६७.

करका गार.
करंड करंडा, करंडूल, करंडी.
करपत्र करवत.
कराल ( भयंकर ), अक्राळ, विक्राळ.
करोटी ( कपाळाचें हाड ), करटी, करवटी, करवंटी.
कर्कटक खेंकडा.
कर्कटी कांकडी.
कर्चूर (वृक्षविशेष), कचरा.
कर्ण कान, ( नियम ९ पान. ११ ).
कर्णाट कानडा, कानडी.
कर्पट ( फडकें ), कापड, कपडा.
कर्पूर कापूर.
कल् ( शब्द करणें ), कलकल=कलकलाट, कल्ला.
कल्[1] ( जाणें, ओढणें ), कळणें, कळकळ, आकलन=आकळणें, उत्कलन=उकळणें.
कलंक ( मळ ), काळंक, कळकणें.
कलश कळस, काळशी.
कलाप ( समुदाय ), काळप.
कलावती[2][3] ( वेश्या ) काळवंतीण.
कलिका कळी, उत्कलिका=उकळी.
कलिंग कलिंगड.
कल्लोल ( गोंगाट ), कल्होळ.
कष् ( घांसणें, इजा देणें ), कस, कसोटी, कसणें, कष्ट=खस्ता.
काकोल कावळा, द्रोणकाकोल=डोमकावळा.
कच् ( प्रकाशणें ) काच ( भिंग ) कांच. काचकार-कासार.
कांच् ( बांधणें ), कांचणें, कांचा.
कांड ( तुकडा ), कांडें, कांडी.

---

१. ये गत्यर्थास्ते ज्ञानार्थाः म्हणजे ज्या धातूंचा अर्थ जाणें असा आहे त्यांचा समजणें असा अर्थ होतो. संस्कृतांतील या नियमास अनुसरून कळणें याचा अर्थ जाणणें असा झाला आहे. २. नृत्य, गान इत्यादि कला जिला आहेत ती. ३. कलावती हा शब्द स्तुत्यर्थक असून वेश्यांमध्येंच नृत्य-गायनादि कला शिकण्याचा प्रचार पडल्यामुळें निंदार्थक झाला. पूर्वींच्या राजकन्यांप्रमाणें स्त्रियांत शिक्षणाची चाल असती तर या शब्दाची अशी दशा झाली नसती.

काण काणा.
कामला कामीण, कावीळ.
काय काया-(शरीर).
कार्पास कापूस, कापशी.
कारवेल कारली.
काल काळ, दुष्काळ, (वाईट वेळ), दुकळ. सुकाल (चांगला वेळ,) सुकाळ.
काश् (तेजस्वी होणें) प्रकाश, प्रकाशित, प्रकाशणें.
काष्ठ काठी, काष्ठवाटी=काठवट, काष्ठवर्ति=काडवात, काडी, काठुक.
काष्ठा (दिशा, शेवट), कांठ.
कांस्य (प्रा० कंसं), कांसें.
काक्ष् (इच्छिणें) आकांक्षा, कांक्षा.[१]
किट्ट कीट.
कीट किडा, कीड.
कील् (बांधणें), कीलक=खिळा,[२] खीळ, खिळणें.
कुंकुम (केशर) कुंकु.[३]
कुक्कुट कोंबडा.
कुच् (संकोच पावणें) संकोच, संकोचणें, कुचकुचणें, आकुंचन=आंखुडणें, कुंचा.
कुटज कुडा.
कुट्ट् कुटणें, कुटका.
कुटिल कुटाळ, कवटाळ.
कुट्टिनी कुंटीण, कुंटण.
कुटी कुडी.
कुंठ् (अडथळा करणें), कुंठित, खुंटणें.
कुठार कुऱ्हाड.
कुंड (भांडें) कुंडी, कुंडा, कुंडला, कोंडाळें.
कुड्य कूड, कुडणें.
कुण् (शब्द करणें) कुणकूण.
कुत्र कुठें, कोठें.
कुत्स् (वाईट होणें) कुजणें. कुत्सित=कुजका.
कुथ् कुथणें, कुथ.
कुद्दाल कुदळ-ळी.
कुप् (रागावणें), कोप. कोपणें.

---

१. मराठींत कांक्षा शब्दाचा संशय असा अर्थ झाला. त्याच्या मनांत कांक्षा आली ह्मणजे संशय आला असा अर्थ समजतात. २. कित्येक संस्कृत शब्द मराठींत येतांना यांतील कच्या जागीं ख किंवा ग होतो. बक=बगळा. कूट=खोटें. सकल=सगळा. ३. केशर हा उत्तम सुगंधी पदार्थ असल्यामुळें कपाळीं लावण्याचा प्रघात पडला असावा. परंतु केशर महाग असल्यामुळें हळदीची पिंजर करितात त्यासच कुंकु ह्मणण्याचा प्रघात पडला.

**कुब्ज** कुबडा, खुजा (प्रा॰ खुज्जो व॰ २-३४,) खुजट.

**कुंबा** कुंपण.

**कुंभकार**[1] कुंभार.

**कुर्** (शब्द करणें) कुरकूर, कुरबूर.

**कुल्या** (पाट) कालवा.

**कुशलिन्** खुशाल, खुशाली, खुशालणें.

**कुष्ठ** कोड[2].

**कुस्तुंबुरु** कोथिंबीर.

**कुक्षि** (प्रा॰ कुच्छि), कूस, कुशी.

**कूज्** (अस्पष्ट शब्द करणें), कुजबुजणें, कुजबूज.

**कूट** कोडें, खोटें.

**कूप** कुवा (प्रा॰ कुव).

**कूर्पर** कोंपर.

**कूष्मांड** (प्रा॰ कुहालो, कोहळा.

**कृ** करणें, कर्म, काम, कार्य, (प्रा॰ कज्ज) काज, कार्यस्थान=कारस्थान, कर्मकार=कामगार, सुकर=सुगर, सुगरण, कृत्य, करणी, क्रिया, संस्कार[3], संस्कृत, संकर.

**कृत्** (कापणें) कृंतन=कांतणें, कांतीव, कर्तरी=कातर.

**कृत्या** (राक्षसी) (प्रा॰ किच्चा,) कीच (दुःखाची आरडाओरड झाली ह्मणजे कीच पडली असें ह्मणतात.) किचाट.

**कृपा** (प्रा॰ किवा) कींव.

**कृमि** (किडा) किरीम.

**कृष्** (ओढणें) आकर्षण=आकसणें, किसणें.

**कृष्ण** (प्रा॰ कण्हो) कान्हा.

**कॄ**[4] (उडविणें) किरण, उत्कीरण=उकरणें, उकरडा, विकिरण=विखरणें, कोरणें, कोरींव.

---

१. नामास कार लागून जीं संस्कृत नामें होतात त्यांतील कार याच्या कचा लोप होऊन आर याचा नामाच्या अशीं संधि होतो. जसें—कुंभकार=कुंभ-आर=कुंभार, लोहकार=लोहार. २. संस्कृत शब्दांतील 'उकारास ओ होतो' जसें—पुष्=पोसणें, सुवर्ण=सोनें, शुंडा=सोंड, कूर्पर=कोंपर. ३. चांगलें या अर्थाचा द्योतक सम् हा उपसर्ग कृ धातूस लागला ह्मणजे कृ धातूच्या मागें स् हा वर्ण लागतो. एकत्र या अर्थाचा सम् उपसर्ग लागून संकर शब्द झाला याचा अर्थ एका ठिकाणीं होणें असा आहे. जसें—वर्णसंकर. ४. कित्येक शब्दांच्या ऋकारास इ आदेश होतो. वररुचि १—२८.

**केवळ** (प्रा० णवर ) निवळ.
**केश** केंस.
**कोटी** कोट.
**कोण** कोन, कोनाडा, कोंपरा.
**कोमल** (प्रा० कोवल)=कोंवळा.
**कोष्ठ** कोठा=कोष्टागार=कोठार.
**क्रम्** (जाणें) क्रमणें, करमणें. क्रम=अनुक्रम.
**क्री** ( विकत घेणें ) विक्रय=विकरी, विकणें, अक्रीत.
**क्रोश** कोस.
**क्रोष्टा** कोल्हा.
**क्लिश्** ( पीडा देणें ). क्लेश ( प्रा० किलेसो ) किळस, क्लिष्ट.
**क्वथ्**[1] कढणें, कढ, कढी. उत्क्वथन=उकाडणें, क्वाथ=काढा.
**खच्** खचणें, खाच, खाचर.
**खट्वा** ( वाज ) खाट.
**खंड्** (तुकडा पाडणें) खांड, अखंड, खंडणी, खडा.
**खदिर** खैर.
**खन्** खणणें खात=खड्डा, खाडा, खातक=खंदक, खांदणें, अखात, खाण, खाई, उत्खनन=उखळणें, उखळ.
**खरतर** खडतर.
**खर्ज्** खाजविणें, खाज, खर्जू=खरूज, खर्जन=खाजणें.
**खर्जूर** खजूर.
**खर्पर** खापर.
**खल** खळें.
**खाद्**[2] खाणें, खाद्य, खाऊ, खादाड, ( प्रा० खाद्य )=खाजें.
**खिद्** ( त्रास होणें ) खेद[3] खिन्न, खिजणें, खिजवणें.
**खुड्** (तोडणें) खुडणें, खोड, आंखुड(किंचित् तोडलेला).

---

१. वर० ८—२९ क्वथ् धातूच्या थकारास ढ होतो. २. वररुचि ८—२७. खाद् धातूस खा आदेश होतो. भक्षण करणें हा खाद धातूचा अर्थ कायम राहून आणखी सोसणें, घेणें, असे अर्थ मराठींत झाले. जसें; मार खाणें, लांच खाणें इत्यादि. ३. संस्कृतांत धातूस अय प्रत्यय लागून प्रयोजक क्रियापदें होतात. जसें—खिद्यति=त्रास पावतो. खेदयति=त्रास देतो. या अय प्रत्ययापासूनच मराठींतील प्रयोजक प्रत्यय अव किंवा इव हे झाले आहेत. खेदय=खिजवणें, वादय=वाजविणें, कारय=करवणें, इत्यादि.

खेला ( बालक्रीडा ) खेळणें, खेळ, खेळा.
खोड ( लंगडा ) खोडा.
ख्या ( बोलणें ) ख्याति, प्रख्यात, आख्यान, संख्या, संख्यान¹=सांगणें.
गंजा (दारूचा पिठा) गांजा².
गण् (मोजणें)गणाति, गणित, गणना,गणन=गणणें.
गंध ( वास ) सुगंधी, गंध्या, गंध, गंधी.
गंधोली गांधील, गांधीण.
गम् ( जाणें ) गमन, आगमन, गमावणें, निर्गम=निघणें, उद्गमन=उगवणें, उगम, संगम, संगति=संगत. अगति=अगत्य. जंगम (चालणारा). नग ( न चालणारा=पर्वत ). आगंतुक ( न बोलावतां येणारा ) आगांतुक.
गर्ज् गर्जना, गर्जन=गाजणें.
गर्त⁴ ( खळी ) गाडणें.
गर्दभ गाढव—वी ( प्रा० गड्डहो ) गद्धा.
गर्भ गाभा, गाभ, गर्भागार, गाभारा, गर्भिणी=गाभण⁵, गर्भार.

---

१. संस्कृत सम् या उपसर्गाचें मराठी शब्दांत सां असें रूप होतें. जसें; संचय=सांचणें, संस्थापन=सांठवणें, संवरण=सांवरणें, संभार=सांभारें. २. मूलार्थांत अमली पदार्थांचा संबंध आहे तेवढा कायम राहून हें भांगेचें नांव झालें असावें. ३. संस्कृतांत धातूच्या मागें उपसर्ग लागून एकाच धातूचे अनेक अर्थ होतात.

| | |
|---|---|
| गमन=जाणें. | अनुगमन=अनुसरणें. |
| आगमन=येणें. | हृ=हरण करणें. |
| निर्गमन=निघणें. | प्रहृ=मारणें. |
| अपगमन=दूर जाणें. | आहृ=खाणें. |
| संगमन=एकत्र होणें. | संहृ=गोळा करणें. |
| उपगमन=जवळ जाणें. | विहृ=खेळणें. |
| अवगमन=जाणणें. | परिहृ=दूर करणें. |
| | व्याहृ=बोलणें. |

४. वरुनि ३—२५ गर्ते शब्दांतील र्त चा ड होतो. ५. गर्भिणी, सामान्य गर्भवती स्त्रीचा वाचक आहे परंतु मराठींत अर्थसंकोच होऊन गाभण हा शब्द गाय, म्हैस इत्यादि पशूंस मात्र लागतो.

गर्ह् (निंदा करणें) गाऱ्हाणें.

गल् गळणें, गलित, गाळणें, गाळ, गळती, प्रगलन=पागळणें, विगलन=वगळणें, अवगलन=ओघळणें. ओघळ.

गल गळा, गल=सृ=गळेसर, गळेसरी.

गल्ल गाल.

गवय गवा.

गवेष् (शोधणें) गवेषण=गवसणें.

गा गाणें, गायन, गान, गायक=गवई, गाथा (गद्य).

गिल् गिळणें, गिळगिळित.

गुच्छ घोंस.

गुंजा गुंज.

गुंड् गुंडाळणें, गुंडी.

गुड गुळ, गोड, गोडी.

गुण् गुणणें, गुणाकार, गुणनिका=गुंडिका.

गुप् (रक्षण करणें) गुप्त, संगोपन, संगोपणें.

गुंफ् गुंफणें, गुंफा, गोफ, गोफण.

गुर्जर गुजर, गुर्जरराष्ट्र=गुजराथ.

गुह् (लपविणें) गुह्य (लपवून ठेवण्यास योग्य)=गुज, गूढ, गुहा.

गृध् अति लोभ करणें. गृध्र गीध, गिधाड.

गेंदुक गेंद.

गैरिक (गिरि ह्मणजे पर्वत त्यांत उत्पन्न झालेला पदार्थ) गेरू (काव.)

गो गाय, गाई, गव्य, गोपाळ=गवळी, गोस्थान=गोठण, गोष्ठ=गोठा, गोरक्षक=गुराखी. गोवर्ण, गोंवरें. गोंवरें. गोविट् (गाईचें शेण)=गोंवरी.

गोत्र गोत, गोत्रावळी=गोतावळ, गोतावळा.

गोधूम गहूं (प्रा० गहूम).

गोनस (साप) घोणस.

---

१. प्र ह्या उपसर्गाचें मराठींत पा असें रूप होतें. जसें—प्रभात=पाहाट, प्रझरण=पाझरणें. २. मराठींत शोधण्याचा परिणाम ह्मणजे सांपडणें असा अर्थ झाला. ३. हा शब्द वैदिकांच्या बोलण्यांत येतो. पाठ होण्याकरितां पुनः पुनः घोकणें यास गुंडिका असें ह्मणतात. ४. हा रोग मुलास झाला असतां गाईच्या रंगाप्रमाणें मुलाचें आंग होतें ह्मणून या रोगाला गोंवरें असें नांव पडलें.

**गोल** ( वाटोळा ) गोळा, गोल, गोलक.

**गोलक** ( विधवेच्या पोटीं परपुरुषापासून झालेला ) गोळक.

**गोस्वामी** गोसावी, ( गो=इंद्रियें त्यांचा स्वामी ह्मणजे त्यांस स्वाधीन ठेवणारा ).[1]

**गोक्षुर** गोखरूं ( सराटे ).

**गौर** गोरा.

**ग्रंथ्** ( रचणें ) ग्रंथ, ग्रंथी, गांठ, गांठोडें, ग्रंथन=गांठणें. गांठी, गांठलें.

**ग्रस्** ( गिळणें ) ग्रास=घांस, ग्रसन, ग्रासणें.

**ग्रह्** ग्रहण=प्रा० घेण्ह=घेणें ग्राहक=गिऱ्हाईक, गृहीत्वा=प्रा० घेऊणं,[2]=घेऊन. गृहं[3]=( आपल्या ठायीं धान्यादि वस्तूंचा संग्रह करणारें ) घर, गृहरत=घरत =गरत.

**ग्राम** गांव.

**ग्रीष्म** (उन्हाळा प्रा० गिह्म) गिह्मवा, गिह्मवस, ( उन्हाळ्यांत पेरलेलें शेत कोंकणांत प्रसिद्ध आहे ).

**घट्** घडणें, घट=घडा,[4] अघटीत, घटीत, घांटलें, घांटणें, विघटन=बिघडणें, विघाट=बिघाड, घटन=घटणें, संघटन=संघट्टन, सांगाडा. उद्घटन =उघडणें, उघडा, सुघट =सुघड, घटना, घडण.

**घंटा** घांट, घांटी.

**घट्ट** घाट ( नदी वगैरेचा ).

**घटी** घडी, घटका, घड्याळ.

**घन** (लोहाराचें हत्यार) घण.

**घन** (दाट) घण ( कोंकणांत प्रसिद्ध आहे जसें—घण ताक आहे ह्म० दाट ताक आहे. )

**घर्म** घाम. घर्मावलि=घामोळें.

**घुट्** (वाटोळें फिरविणें) घोटणें, घोटा, घोटाळा, घोटाळणें.

---

१. हल्लींच्या गोसाव्यांत जितेंद्रियता नसून गोसावी हा एक धंदाच झाला आहे. २. संस्कृतांतील पूर्वकालवाचक 'त्वा' प्रत्ययास प्राकृतांत ऊण आदेश होतो. ३. वररुचि. गृह शब्दास घर आदेश होतो ४—३२. ४. संस्कृत शब्दांतील टस ड होतो. जसें—वट=वड, तट=तड, मर्कट=माकड.

**घुर्ण**[1] ( प्रा० घोल ) घोळणें.

**घुर्** ( भयंकर शब्द करणें ) घोर, घोरणें, घुरघुर.

**घुष्** ( शब्द करणें ) घोष, घोषण=घोकणें, घोकणी, घोक्या.

**घूर्ण्** ( प्रा० घुम्म ) घुमणें.

**घृत** ( प्रा० घीअ ) घी ( हिंदुस्थानींत फार येतो ).

**घृष्** घांसणें, घर्षण, घसण, घस.

**घोट** घोडा.

**घोषक** घोसाळें.

**घ्रा** (वास घेणें) घ्राण, (नाक) घाण.

**चक्** ( दचकणें ) चकित, चकणें[2], चक्क.

**चक्र** चाक, चाकी, चक्री, चक्कर

**चंचु** चोंच, चोंचावणें.

**चणक** चणे, ( हरभरे ).

**चतुर** ( शहाणा ) चातुर्य=चतुराई.

**चतुर्** चार, चतुर्दश=प्रा० चउद्दह=चौदा, चतुर्थी =प्रा० चउत्थी=चौथ, चतुष्क=चौक. चतुरश्र =चौरस.

**चत्वारिंशत्**=चाळिस.

**चद्** ( आनंद होणें ) चंद्र=चांद=चांदणें, चांदणी, चांदवा, ( चंद्रासारखा ) चांदवी, चंदन, चांदी (चंद्रासारखी तेजस्वी).

**चंपक** चाफा.

**चपेट** ( ज्याचीं बोटें पसरलेलीं आहेत असा हात ) चापट चपटा.

**चम्** ( खाणें ) चमचा, चमचमित, चमचमाट, आँचमन[3], आंचवणें.

**चमर** (हरिण) चंवरी, चंवर ( चमर जातीच्या हरिणाच्या शेपटाची केलेली ).

**चर्** ( खाणें ) चारणें, चारणी, चारा.

---

१. घुण् ( फिरणें ) या धातूस ‘ घोल ’ आदेश होतो. वररुचि ८—६.

२. मनुष्य चकित झाला म्हणजे त्यास कांहीं सुचेनासें होतें यावरून एकादा कांहीं भूल पडून फसला म्हणजे तो त्या कामांत चकला असें म्हणतात.

३. आचमन याचा अर्थ विधिपूर्वक मुखांत उदक घेणें असा आहे. परंतु मराठींत भोजनोत्तर धुण्याकरितां मुखांत पाणी घेणें असा अर्थ झाला.

चर् ( चालणें ) संचार, आचार, दुराचार, संचारणें. आचार्य, विचार, प्रचार, उपचार, उच्चार, व्यभिचार, चरित्र, चार ( जासूद), अनुचर, कुचर=(वाईट चालणारा ) कुचर, कुचराई, आचारी.

---

१. आ उपसर्गपूर्वक चर धातूचा अर्थ सत्कार करणें, सेवा करणें, असा आहे, त्यास कर्मवाचक य प्रत्यय लागून आचार्य शब्द झाला आहे. त्याचा अर्थ सेवा करण्यास योग्य असा आहे. पूर्वी गुरुगृहीं राहून त्याची सेवा करून विद्याभ्यास करण्याचा परिपाठ असे तो या शब्दावरून द्योतित होतो. गुरूची सेवा करून विद्या प्राप्त करून घेणें, किंवा द्रव्य देऊन विद्या शिकणें, किंवा आपल्यास येईल तें दुसऱ्यास शिकवून आपणास येत नसेल तें त्याजपाशीं शिकणें हे विद्या करण्याचे तीन मार्ग समजले आहेत. हल्लीं दुसरा ह्मणजे द्रव्य देऊन विद्या शिकण्याचा मार्ग सुरू आहे. पूर्वी आपल्या देशांत बहुतकरून सर्व ठिकाणीं पहिलाच मार्ग सुरू होता, हें आचार्य किंवा उपाध्याय, ह्या शब्दांवरून स्पष्ट होतें. दुसरी एक महत्वाची गोष्ट या शब्दांवरून कळून येते ती ही कीं, आचार्याची किंवा उपाध्यायाची स्त्री या अर्थी आचार्य किंवा उपाध्याय शब्दाचें स्त्रीलिंगरूप आचार्यानी किंवा उपाध्यायानी असें होतें; व जी स्त्री स्वतः व्याख्यान देणारी किंवा शिकविणारी तिला आचार्या किंवा उपाध्याया असें ह्मणावें असें सांगितलें आहे. यावरून पूर्वी जसे मोठे अनेक विषयांवर व्याख्यान देणारे आचार्य असत त्याप्रमाणेंच मोठमोठ्या विद्वान् नामांकित स्त्रिया आचार्या असत, त्या गहन विषयांवर व्याख्यान देत व पुष्कळ विद्यार्थी पढवीत असें या शब्दांवरून स्पष्ट होतें. स्त्रिया पूर्वी विद्या शिकत याविषयीं पाराशरमाधवीय या ग्रंथांत यमाचें वचन आहे तें येणेंप्रमाणें:—पुरा कल्पे तु नारीणां व्रतबंधनमिष्यते ॥ अध्यापनं च वेदानां सावित्रीवचनं तथा ॥ १ ॥ तसेंच अग्निहोत्रादिक कित्येक यज्ञकर्मांत केवळ स्त्रियांनीं ह्मणावयाचे मंत्र आहेत. यावरून पूर्वी भरतखंडांत पुरुषांप्रमाणेंच स्त्रिया विद्या शिकत होत्या यांत संशय नाहीं. स्त्रियांनीं कोणतीही विद्या न शिकण्याची चाल या देशांत यवनी राजे झाल्यापासून पडली हें निःसंशय आहे. २. आचार ह्मणजे शुचिर्भूतपणा, तो ज्यास आहे तो आचारी असा आचारी शब्दाचा अर्थ आहे. स्वयंपाकाच्या कामांत फार स्वच्छपणा ठेवण्याची चाल विशेषतः ब्राह्मणांत आहे. घरांत स्वच्छ बायको असेल तिनें स्वयंपाक करावयाचा अशी चाल आहे. याक-

चर्म (कातडें) चामडें, चर्मकार=चांभार.

चर्व् चावणें, चावा, चावरा.

चल् (हालणें) चालन, चाळण-णी, चंचळ, चालणें, चळ, चाल, उच्चलन=उचलणें, उचल, उचल्या.

चाप (धनुष्य) चाप.

चि[1] (ढीग करणें) चिणणें, सांचणें, सांचवणें, संचय, विचय=वेचणें.

चिक्कण चीक, चिकट, चिकटा.

चिंचा चिंच, चिंचुका.

चिंत् (विचार करणें) चिंतन, चिंतणें, चिंता.

चित्रकार चितारी.

चिर्भटी चिबूड.

चुंब् (चुंबन करणें) चुंबन, चुंफणें.

चुक्रिका=चुका (भाजी).

चुर् (चोरणें) चौर्य=चोरी, चोर.

चुल्ली चूल.

चूर्ण् (संकोच करणें). चूर्ण (प्रा० चुण्णो) चुना. चूर्ण=आलय = चूर्णालय =चुनाळ, चुणणें, चूण.

चूष् (पिणें) चोषण चोखणें.

चिट् (चाकरी करणें) चेटक (चाकर.) (प्रा० चेटअ) चेडा=चेला, (अर्थांतर होऊन शिष्य असा अर्थ झाला).

छद् (झांकणें) आच्छादन, छत्र=छत, छत्री.

छंदस्[2] (वेद, पद्य) छंद, छांदस, छांदिष्ट, छंदिष्ट.

छल (कपट) छळणें, छळ.

---

रितांच लहान मुलींनीं स्वयंपाक केला असतां वृद्ध माणसें जेवीत नाहींत. यामुळें स्वयंपाक करण्यास कोणी स्वच्छ आचारसंपन्न असा मनुष्य ठेवीत. त्यामुळें स्वयंपाक्यास आचारी असें नांव पडलें.

१. चि धातूस चिण आदेश होतो. वररुचि ८—२९. २. छंदस् ह्मणजे वेद किंवा पद्य असा मूळचा अर्थ आहे. सांप्रतकाळीं भाषाशास्त्रवेत्त्यांनीं ज्या भाषांस आर्यभाषा असें नांव दिलें आहे त्या सर्वांत संस्कृत भाषा फार प्राचीन होय. तिला पुष्कळ काल गेल्यावर पाणिनीनें तिचें व्याकरण केलें. त्या वेळेस जे शब्द लोकव्यवहाराच्या भाषेंत नसून

**छाग** (बोकड) सागळ (जो-ड्याची.)

**छाया** सावली, प्रतिच्छाया, पेंडसावली.

**छिक्का** शिंक, शिंकणें.

**छिद्** (कापणें) छेद=छेदन, छेदणें, छिद्र, उच्छेद.

**छुर** (कापणें). छुरिका सुरी.

**जगत्** जग.

**जंगल** (रान) जांगळी, (गुराखी).

**जड** जड.

**जन्** (उत्पन्न होणें) जन्म, जननी, जनक, जन, जंतु, जंत, जातः=जाला=झाला, जाति=जात, जाया (पत्नी). प्रजा.

---

केवळ वेदांत मात्र होते त्यांस त्यानें छांदस ह्मटलें. त्यावरून व्याकरणनियमाबाहेरचे जे वेदांत किंवा महाभारतासारख्या आद्य ग्रंथांत येणारे शब्द त्यांस छांदस असें नांव पडलें. या शब्दांतील नियमबाह्य एवढा अर्थांश घेऊन ज्या मनुष्याचें आचरण लोकव्यवहारानियमाबाहेर असतें त्यास छांदिष्ट असें ह्मणण्याचा परिपाठ पडला. यावरून छंदिष्ट किंवा छांदिष्ट याचा अर्थ यथेच्छ आचरण करणारा, वेडसर असा व्यवहारांत झाला आहे. आर्ष शब्दाचा इतिहास असाच आहे. आर्षशब्द ऋषिशब्दापासून झाला आहे, त्याचा अर्थ ऋषीचा, ऋषीनें उच्चारलेला असा आहे. राजकृत नियमांनीं राजा बद्ध होत नाहीं, असा राजनीतीचा एक सिद्धांत आहे त्याप्रमाणें, व्यासवाल्मिकांसारखे समर्थ व स्वतंत्र कवि व्याकरणनियमांनीं बद्ध होत नाहींत या अर्थाचा (निरंकुशाः कवयः) कवींला प्रतिबंध नाहीं असा एक भाषातत्त्ववेत्त्यांचा सिद्धांत आहे. त्याप्रमाणें व्याकरणनियमबाह्य एकाद्या शब्दाचा प्रयोग आढळला ह्मणजे त्याला आर्ष प्रयोग असें ह्मणतात. त्यावरून लोकस्थितिनियमबाह्य आचरण करणाऱ्यास आर्ष ह्मणण्याचा संप्रदाय पडून आर्ष ह्मणजे यथेच्छ वागणारा, वेडा असा अर्थ झाला.

१. संस्कृत प्रति या उपसर्गाचें मराठींत पड असें रूप होतें. जसें—प्रतिशब्द=पडसाद, प्रतिछाया=पडसावली. २. झाला यास अर्थसादृश्यावरून हो धातूचा भूतकाळ मानिलें आहे, परंतु जाला किंवा झाला हीं रूपें जन् धातूचा जो जा आदेश त्यापासून झालीं आहेत.

**जप्** (मनांत ह्मणणें, चिंतिणें) जप, जपणें. जपून काम कर ह्मणजे विचारपूर्वक कर. यावरूनच जपणें ह्मणजे रक्षण करणें असा अर्थ झाला.

**जंबीर** जांब.

**जंबु** जांभूळ, जांबळी.

**जल्प्** (बडबडणें). जल्पणें.

**जलूका** जळू.

**जागृ** जागणें, जागर, जागरण, जागृत=जागा, जागरूक.

**जाति** जाई (फुलझाड).

**जामातृ** जामात, जांवई.

**जाल** जाळें, जाळी.

**जि** जिंकणें, जय, अजिंक्य, विजय.

**जिह्वा** (प्रा०जीहा) जीभ, प्रतिजिह्वा=पडजीभ.

**जीरक** जिरें.

**जीव्** (वांचणें) जीव, जीवन=जगणें, जिणें.

**जुड्** (बांधणें) जोडणें, जोड.

**जृम्भ्** (शरीर ताणणें) जृंभा जांभई.

**जॄ** (वृद्ध होणें) जरा, जरठ, (जारठ, जारठणें, जीर्ण, जर्जर, जुना, जुनाट, जार[1]=यार.

**जिम्** (खाणें) जेमन जेवण.

**ज्येष्ठ** (वडील) जेठी, (वयानें मोठा असा अर्थ असतां बळानें मोठा असा अर्थ झाला).

**ज्योतिस्** (उजेड) ज्योत, झोत. ज्योतिषी=जोशी.

**ज्वल्** (प्रकाशित करणें) जळणें, ज्वाला=जाळ, उज्ज्वल=उजळ, उजळणें,

---

१. परस्त्रीगमनासारखें आयुष्यहानि करणारें कांहीं नाहीं याकरितां तें करणाऱ्यास जार (आयुष्यनाश करणारा) असें ह्मटलें आहे. "नहीदृशमनायुष्यं लोके किंच न विद्यते ॥ यादृशं पुरुषस्येह परदारोपसेवनम् १" मनुस्मृति ४—१३४.

उजळणी[1], उजेड, उजाड[2] सुज्वल=सोज्वळ. प्रज्वलन=पाजळणें.

**झष्** ( हिंसा करणें ) झष ( मासा ) झकमारणें[3].

**झृ** झरणें,झरा,पाझरणें,पाझर, अवझरण=ओझरणें[4].

**टंक्** (बांधणें).

**टंक** टांकी, टांकें ( दगड फोडून केलेलें ).

**टिक्** ( जाणें ) टिकणें.

**टिट्टिभ** टिटवी–वा.

**डाकिनी** (पिशाच्च )डंकीण.

**डी** ( उडी मारणें ) उड्डाण= उडणें, उडी, उडाणटप्पु.

**ढक्का** डंका.

**तक्र** ताक, ताकतई

**तट्** ( वाढणें. ) तट (तीर), तड गंगातट=गंगथडी, भीमातट=भिमथडी.

**तड्** ( मारणें ) ताडण, ताडणें. तडा.

**तडाग** ( प्रा० तलाओ ), तलाव, तळें.

**तंडुलीय** तांदुळजा (भाजी).

**तत्र** ( प्रा० तेथ्थ ), तेथें.

**तन्** ( लांब करणें ), संतान, तनय, संतति, ताणणें,ताणा (सुताचा ) तंतु, तांत,

---

१. उजळणें ह्मणजे स्वच्छ करणें, यावरून शिकलेल्या ग्रन्थाची आवृत्ति करून तयार करणें यास उजळणी करणें असें ह्मणतात; जसें—अमरकोशाची उजळणी कर. मुलांस अक्षरें, अंक वगैरे पुनः पुनः पाठ करून शिकवावे लागतात यावरून, उजळणी हा शब्द झाला. कित्येकांचें असें मत आहे कीं आपल्या देशांत आरंभीं धुळीच्या पाटीवर अक्षरें, अंक वगैरे शिकण्याचा संप्रदाय आहे ह्मणून धुळाक्षर असें नांव पडलें. पाटी मळली ह्मणजे उजळून स्वच्छ करून पुनः लिहावें लागतें यामुळें पूर्वीं, उजळणी कर ह्मणजे पाटी स्वच्छ कर असा अर्थ होता; त्यावरून अभ्यास मलिन झाला असतां तयार करणें यास उजळणी असें नांव पडलें. दोन्ही प्रकारांत स्वच्छ करणें हा मूलधात्वर्थ आहेच. २. प्रकाशित असा मूळचा अर्थ असून ओसाड असा अर्थ झाला. ३. मासे मारणें हें वाईट काम समजलें असल्यामुळें कोणी वाईट काम केल्यास तो झक मारतो असें ह्मणतात. ४. संस्कृतांतील अव आणि अप या उपसर्गास ओ आदेश होतो. वररुचि ४—२१ अवझरण=ओझरणें, अपसरण=ओसरणें.

उत्तान=उताणा. तत[1]=तात=ताल्या. तनु=(शरीर) तन.

तप् तापणें संताप, ताप=ताव[2], तापट, तवा, तावणें, तापन, तापविणें, पश्चात्ताप=पस्तावा.

तरंग (पाण्याची लाट) तरंगणें.

तरक्षु तरस.

तरुण तरणा.

तर्क् (बोलणें) तर्क तर्कट[3]—तर्कटी.

तर्हि तर, तरी.

तक्ष् तासणें, तासणी.

तांबूल तांबोळी.

ताम्र तांबें, तांब्या, तांब, तांबली, ताम्हन, तांबडा. ताम्रकुट्ट=तांबट. ताम्रशाली=तामसाळ (तांदुळांची एक जात आहे).

तल् (स्थापना करणें). तल (अधोभाग) तळ.

ताल (गाण्यांतील) टाळ, टाळी.

ताल (वृक्षविशेष) ताड, ताडी.

तालु टाळु.

तिक्त तिखट.

तिल तीळ.

तिलक टिळा, टिकला, टिकली.

तीक्ष्ण (तीव्र) तिखें.

तुच्छ (हलकट) तुसडा, तुसड.

तुद् (भांडणें) तुटणें, तुट्टि.

तुड् (तोडणें) तोड, तोडा. तुंड[4] तोंड.

तुंद दोंद तुंदिल=दोंदील.

तुंब् (पीडा देणें) तुंबणें.

तुमुल (भयंकर) तुंबळ.

तुरी तरई (कोष्टयाचें वस्त्र गुंडाळण्याचें लांकूड).

---

१. तत हें तन् धातूपासून झालेलें भूतकालीं विशेषण होय. त्याचा मूलार्थ विस्तृत झालेला असा आहे. कारण सन्तति हा पित्याचा विस्तारच होय. यावरून फार जुन्या संस्कृतांत बापास तत हा शब्द आहे; त्यास स्वार्थी अ प्रत्यय लागून तात शब्द झाला. त्यापासून मराठींत ताल्या हें सन्मानार्थ उपपद निघालें. २. संस्कृत शब्दांतील पस व होतो. ताप=ताव. कूप=कुवा. सपत्नी=सवत. कृपा=कीव. दीप=दिवा. ३. तर्क ह्मणजे अनुमान करणें असा अर्थ आहे. न्यायशास्त्र जाणणारे नानाप्रकारचे तर्क करून वादांत प्रतिपक्ष्याचा पाडाव करतात यामुळें हा शब्द कलहद्योतक झाला. ४. नियम ४ पान ११.

तुरुष्क[1] तुरूक, तुर्की.

तुल् ( वजन करणें ) तुलना, तोलणें, तुला=तुळा, तोल, तोळा ( वजन ).

तुवरी तूर ( धान्यविशेष ).

तुष् ( खुष होणें ) संतोष, संतोख, संतोषणें.

तुष ( कोंडा ) तूस.

तृण् ( खाणें ) तृण ( प्रा० तेण[2] ) तन, (गवत), कुतृण=कस्तन.

तृप् ( संतुष्ट करणें ) तर्पण, तृप्ति, तर्पिणें.

तृष् ( पिण्याची इच्छा होणें) तृषा तृष्णा—तहान.

तृ ( तरणें ) तारणें, तारण, तारूं, तारक, उत्तरण=उतरणें[3], उतार, उतराई, तरि ( होडी ). तीर्थ.

ते तें[4].

तेजस् तेज, तजेला.

तैल तेल, तेली, तेलकट, तैलपक्क=तेलपक.

त्यज् ( सोडणें ), त्याग, टाकणें, त्यागणें.

त्रयोदश ( प्रा० तेरह ), तेरा.

त्रस् त्रासणें, त्रास.

त्रि ( प्रा० तिण्णि ) तीन. त्रिपदी (तीन पाय जिला आहेत ती. )=तिवई, तृतीया=तीज.

त्रिंशत् (प्रा० तीसा ) तीस.

त्रुट् तोडणें, तूट.

त्वम् ( प्रा० तुमं ) तू (प्राकृत प्रथमेचें एकवचन तुमं आणि बहुवचन तुह्मे यापासून तू, तुह्मी अशीं रूपें निघालीं. तुज्झ=तुझें. )

त्वर्=( घाईकरणें ) त्वरा त्वरित तूर्त.

---

१. संस्कृतांत तुरुष्क शब्द आढळतो यावरून तुर्कस्थान आणि हिंदुस्थान यांमध्यें दळणवळण प्राचीनकाळापासून आहे असें दिसतें. २. वर० १—२७. ३. उत् या संस्कृत उपसर्गाच्या तकाराचा मराठी शब्दांत लोप होतो. उत्+गम=उगम. उत्+पाटन=उपटणें. ४. संस्कृतांत तत् हें तृतीयपुरुषवाचक सर्वनाम आहे. त्याचें प्रथमेचें एकवचन सः असें होतें. मराठी तो हें संस्कृतांतील द्विवचन तौ यापासून झालें आहे. ते हें संस्कृतांत व मराठींत सारखेंच आहे. ५. व० २—१४. ६. वर० ६—५६.

दंड्[1] (शिक्षा करणें) दंड=दांडा, दांडी, दंडवत्=दंडवत, उद्दंड=उदंड, दांडकें, दांडु, दांडकणें.

दंत दांत, दांता. दंताळें (शेतकीसंबंधी एक आउत आहे, त्यास दांते असतात).

दधि दहीं[2].

दंभ् (ढोंगकरणें) दंभ. डंभ, डंब.

दम् दमणें, दमा, दम, दामटणें.

दरि (गुहा) दरा.

दर्प् (भिणें) दबणें, दबकणें, दाब.

दल् (फुटणें) दलन=दळणें, दळण, आदलन=आदळणें, डाळ.

दाडिम[3] डाळिंब.

दंश् (चावणें) डांस, दशन=डसणें. दंष्ट्रा[4]=(प्रा० दाढा)=दाढ.

दशन्[5] दहा.

दह् (जळणें) दाहा. दहन,

---

१. दंड् धातूपासून निघालेल्या शब्दांकडे लक्ष दिलें असतां मूळच्या अर्थाचा थोडथोडा संबंध ठेवून कशीं अर्थांतरें होतात तें ध्यानांत येईल. दंड ह्मणजे शिक्षा, ती करण्याचें साधन ह्मणून काठीलाही दंड नांव पडलें, त्यापासून दांडा शब्द निघाला. काठीचा उपयोग आडवी बांधून धोतर वगैरे वाळत घालण्यास करतात त्यामुळें दांडी हा शब्द झाला. आतां उद्दंड याचा अर्थ उंच आहे दांडा ज्याचा तें ह्मणजे उंच छत्री वगैरे. यावरून उदंड ह्मणजे पुष्कळ असा अर्थ झाला. "मी खलदण्डें उदंड तापतसें" मोरोपंत—धेनुहरण. २. संस्कृतांत प्रथमेचें एकवचन 'दधि' असें असून मराठींत 'दहीं' असें सानुस्वार रूप कसें झालें? अनुस्वार हा मराठी प्रत्यय मानावा कीं काय? असे कित्येकांचे पूर्वपक्ष आहेत, त्यांचें संस्कृत व्याकरणावरून समाधान होतें; तें असें कीं, शब्दांतीं येणाऱ्या स्वराचें विकल्पेंकरून अनुनासिक उच्चारण करावें, असा संस्कृत व्याकरणाचा नियम आहे. पाणिनि ८—४—५७. यावरून संस्कृतांत दधिं, दधि अशीं दोन रूपें होतात, त्यांपैकीं 'दहीं' हें सानुनासिकरूपापासून मराठींत आलें आहे. ३. शब्दांमध्यें असंयुक्त ड असल्यास त्यास ल होतो. वररुचि २—२३ दाडिम=दाळिंब, तडाग=तलाव. ४. वर० ४—३३. ५. व० २—४४. दशन् शब्दाच्या श स ह होतो.

दग्ध, निदाघ (उन्हाळा), डाह, डागणें.

दा देणें, दाता=देता, दान, आदा. दायाद (वांटा घेणारा)=दाईज.

दाम दावें, दामनी=दावण.

दीप् (प्रकाशणें) दीप, दिवा, दीपावली=दिवाळी, दीपन=दिपणें,तेवणें,दिवटी,

दुःख दुखणें, दुखवणें.

दुह् (भरणें--पूर्ण करणें), दुहिता=मातापितरांचे मनोरथ पूर्ण करणारी ) (दूध काढणें ) दुग्ध=दूध, दुभतें, दुभती, दुभणें.

दृ ( भिणें ) डरणें, दर=डर, दरद=दरड ( पडण्याचें भय देणारी ), दरारा.

दृ ( फोडणें ) विदारण, विदारणें, विदीर्ण. दारा (भार्या—भावांमध्यें फुटाफूट करणारी.)

दृश्[1] (पाहाणें) दृष्टि, दर्शन =दिसणें, देखणें, आदर्श. प्रा० आरिस=आरसा.

देवकुल देऊळ.

देवर ( प्रा० दिअरो ) दीर.

देहली देवडी.

दैन्य दैना.

दोला दोलन=डोलणें, डुलणें, डोली.

दोहद (प्रा० दोहलो) डोहळे.

द्यूत जुवा, द्यूतकार, जुगार.

द्राक्षा द्राक्ष.

द्रोण ( पात्रविशेष ) द्रोण= द्रोण, द्रोणा.

द्वादश प्रा० बारह, बारा.[2]

द्वि ( प्रा० दोणि[3] ) दोन, द्विगुण=दुणा. द्विवार= दुबार.

धत्तूर धोत्रा.

धन (द्रव्य)धन,धनको,धनी, धनवत्तर (अधिक धनवान)=धनत्तर, धण, धणी.

धनुस् धनुष्य, धनकुली.

धन्वयास धमासा.

धवल ढवळा.

धात्री[4] दाई.

धान्याक धने.

धारा धार, धारी.

---

१. दृश् धातूस कांहीं काळांत 'पश्य' आदेश होतो त्यापासून मराठींत पाह धातु झाला आहे. २. व० ३–१४. ३. व० ६–५७. ४. धे या धातूचा अर्थ स्तनपान देणें असा आहे, यावरून हा शब्द झाला आहे. धात्री म्हणजे स्तनपान देणारी.

**पत्**[1] पडणें, पड, पतित=पडित, अपत्य. पत्र=पात. पत्ता, पात, पातें. पातळ (पडण्याचा ज्याचा स्वभाव तें.) पातक (पाडणारें). अपत्य[2] (ज्याच्या योगानें पूर्वज पतन पावत नाहींत).

**पत्तन** (शहर, नगर) पट्टण (श्रीरंगपट्टण.)

**पद्** (चालणें) पाद, पाय, पाव, पाउल, उत्पद्=उपजणें, निष्पद्=निपजणें. (पान ८ नियम १४.)

**पनस**[3] फणस.

**परश्वः** परवां.

**परुष**[4] (कठोर) (प्रा० फरुस,) फरस, फर्शी.

**पर्ण** पान.

**पर्द्** (वाईट शब्द करणें) पादणें, पाद.

**पर्यंक** (प्रा० पल्लंक) पलंग, पलंगडी.

**पर्युषित** (फार वेळ ठेविल्यामुळें शिळें झालेलें) पारोसा.

**पर्व्** (पूर्ण करणें) पर्व (सांधा) पर्वणी[5], पेर.

**पलाश** पळस.

**पल्लव** पाला, पालवी, पालवणें.

**पल्ली** पाल.

**पश्** (बांधणें) पाश=फांस. पशु.

**पक्ष** पंख[6], पाखरूं, पाखर.

**पश्चात्** (नंतर, मागें) पिछाडी, पिच्छा.

**पा** पिणें, पानीय, पाणी, पेय=पेज, पानक=पन्हें, पान्हा, पाजणें, पात्र.

**पांडुर** पांढरा.

**पाद** (चतुर्थांश) पाव, पाव+ऊन (कमी)=पाऊण.

---

१. वर० ८–५१. २. ज्याच्या योगानें पिता पतन पावत नाहीं तें. ज्यास संतति नाहीं त्यास स्वर्गप्राप्ति नाहीं असें जें शास्त्रवचन आहे त्यावरून अपत्य हा शब्द झाला आहे. मुलगा श्राद्धादिक्रिया करतो त्याच्या योगानें पूर्वजांस सद्गति होते असें मानलें आहे. ३. व० २–३७. ४. वर० २–३६. ५. पूर्णिमा आणि अमावास्या या दोन तिथि महिन्याचे जे दोन भाग त्यांस जोडणाऱ्या आहेत. या यज्ञकर्मास मुख्य मानिल्या आहेत. त्यावरून ज्या दिवशीं विशेष दानधर्म करण्यास सांगितलें आहे त्या तिथीस पर्वणी ह्मणतात. या तिथींस शुक्लपक्ष आणि कृष्णपक्ष हे पूर्ण होतात. ६. संस्कृत शब्दांतील ष किंवा क्ष यांस ख होतो. जसें—रक्षा=राख, हर्ष=हरीख, परीक्षा=पारख.

पापर्द्धि[1] (प्रा० पारद्दी)पारध.
पारद पारा.
पार पारणा, पारणें.
पार् (संपविणें)पार.
पार्श्व (प्रा० पास्स) पासून, पाशीं, पोसाव[2].
पाल् (रक्षण करणें) पालन, पाळणें, पाळणा.
पाली (कांठ) पाळ.
पिच्छ पीस, पिसारा.
पिंज् (रंगवणें). पिंग (रंग) पिंगा, पिंगट.
पिंड् (गोळा करणें) पिंड (गोळा) पिंड, पेंडे[3], पेंढा, पेंडें, पेढा, बिंडा.
पिप्पल पिंपळ.
पिप्पली पिंपळी.
पिष् (चुरा करणें) पिष्ट, पीठ, पीठी.
पीठ (आसन) पेढी, पाट.
पीड् (त्रास देणें) पीडा. पीडन=पिडणें.
पीत[4] (प्रा० पिअल) पिंवळें.
पील्[5] (अडविणें, अवरोध करणें) पिळणें, पीळ, पिळा.
पुंज (रास, ढीग) पुंजका, पुंजी.
पुट् (चिकटविणें) पुट, पुडा, पुडी, पूड.
पुण् (चांगलें कर्म करणें) पुण्य–पुण्याई.
पुत्र[6] (मुलगा) पूत.
पुनः पुन्हा.
पुराण (जुना) पुराणा, पौराणिक=पुराणिक[7].
पुल् (मोठें होणें) पुळी.
पुलिन (वाळवंट) पुळण.
पुष् पोषणें, पुष्ट, पुष्टा, पुष्टि.

---

१. हेमचंद्र ८-१-२३५. पापाची वृद्धि असा पापर्द्धि शब्दाचा मूलार्थ आहे. २. "द्विजीं निषधापासाव ह्मणीजेलें" रघुनाथ पंडित—नलोपाख्यान. ३. पान ११ नियम ३. ४. विद्युत् आणि पीत या शब्दांस 'ल' अक्षर पुढें लागतें. वररुचि ४–२६. ५. वस्त्र पिळणें ह्मणजे आंत पाणी राहण्यास वाट असते ती नाहींशी करणें. त्याच्या आंगांत पीळ आहे ह्मणजे दुसऱ्याचें ह्मणणें त्याच्या हृदयांत शिरत नाहीं. ६. पुत्—त्रा=पुत् या नांवाच्या नरकापासून तारणारा. ७. पुराण शब्दाचा मूलार्थ प्राचीन=जुना असा आहे. पुढें पुराण हें नाम होऊन त्याचा अर्थ, धर्म, इतिहास इत्यादि विषय ज्यांत आहेत असे जे जुने ग्रन्थ आहेत त्यांस पुराण व ते वाचून उपजीविका करणाऱ्यांस पुराणिक असें ह्मणूं लागले.

*पुष्कर[1] ( आकाश ) प्रा० पोक्खरो=पोंखर, पोकळ, पोकळी.

पुस्त् (आदर करणें, बांधणें.) पुस्तक[2] ( प्रा० पोत्थओ ) पोथी.

पूगफल पोफळ,(प्रा.पोप्फल)

पूज् ( पूजा करणें ) पूजन =पूजणें.

पूप पोपी.

पूय् (सडणें, घाण येणें.) पूय, पू.

पल् ( रचणें ) पूल.

पृ ( पूर्ण होणें ) पुरा, पुरता, पूर्ण, पुरणें, पूरण=पुरण. पुरणें.

पृथुक ( प्रा० पुहुअ ) पोहा.

पृष्ठ पाठ.

पेटक पेटी, पेटारा.

प्रकट प्रगट.

प्रच्छ् ( विचारणें ) प्रश्न, पृच्छा, पुसणें.

प्रणाली पन्हळ, पन्हळी.

प्रतीति प्रचीत.

प्रभात[3] पहांट.

प्रवाल पोंवळें.

प्रस्तर (दगड) फत्तर, पाथर.

प्रहर पाहेरा[4], द्विप्रहर=दुपार.

प्राघुणक पाहुणा.

प्रावृट्[5] पाऊस प्रावृट्काल= पावसाळा.

फक्क् ( वाईट वागणें ) फक्कड, फाका, फाकणें.

फटा फडा, फडी.

फणा फणा, फणी.

फल् (उत्पन्न होणें) फळणें, फळ, फलाहार=फराळ[6].

फलक फळा, फळी.

---

*व० १—२०. १. जोडाक्षरांतील श ष स नाहींतसे होऊन त्यांतील वर्गांतील पहिल्या अक्षरास दुसरें अक्षर होतें. जसें—पुष्कर=पोखर, स्कंध=खांदा, स्तंभन=थांबणें. २. संस्कृत शब्दांतील 'स्त' या जोडाक्षरास 'थ' आदेश होतो. जसें—स्तन=थान, मस्तक=माथा, आस्तरण= आथरणें, पुस्तक=पोथी. ३. नियम ६ पान ११. ४. एक एक प्रहरानें पाहेरेकरी बदलण्याची वहिवाट असे तीवरून हा शब्द झाला आहे. ५. कधीं कधीं संस्कृत शब्दांचा प्राकृतांत लिंगभेद होतो. प्रावृष् शब्द स्त्रीलिंगी असून पाऊस शब्द पुल्लिंगी झाला. ६. फराळ ह्मणजे फलाहार, फळें खाणें. पूर्वी ऋषि अरण्यांत राहणारे असल्यामुळें व्रताचे दिवशीं फळें खाऊन उपास करीत, त्यावरून फलाहार हा शब्द झाला. पुढें दाट वस्तीचे गांव व शहरें होऊन उपासास पोटभर खाण्यास फळें मिळत नाहींतशीं

फाल फाळ (नांगराचा) फाळी. फाळणें.

फुल्ल् (विकासणें) फूल, फुलणें, फुली, उत्फूलन =उफळणें.

फेन फेंस.

बक बगळा.

बकुल बकूळ, बकुळी.

बदरी[1] बोर.

बंध् बांधणें, बंधन, बांध, बांधण, बांधणुक, बांधीव.

बधिर (प्रा० बेहीरो[2]) बहिरा, बहिरट.

बल बळ, बळकट, दुर्बल= दुबळा. निर्बल=नेभळा.

बलीवर्द (प्रा० बइल्ल) बैल.

बहिस् (प्रा० बहिरो) बाहेर.

बहुरूपी भोरपी.

बाकूची बांवची.

बाध् (पीडा करणें) बाधणें, बाधा.

बाल बाळ, बाळंतीण, बाळंतें.

बाष्प वाफ.

बाहु बाजू, बाही, बाहुबंध =बाजूबंध.

बिभीतक (प्रा० बहेडओ) बेहेडा.

बिरुद ब्रीद, बिरीद.

बिल्व (प्रा० बल्लो) बेल.

बीज बीं.

बुक्क् भोकणें, भोक (कुत्र्याच्या भोकभर तो गांव येथून लांब आहे असें देशांत ह्मणतात त्याचा अर्थ कुत्र्याचें भोंकणें जितकें लांब ऐकूं जाईल तितक्या अंतरावर).

बुद्बुद बुडबुडा, बुडबुडणें.

---

झालीं तेव्हां रोजचेच खाण्याचे पदार्थ तांदूळ, पीठ, वगैरे भाजून फळांबद्दल खाण्याची चाल पडली तीवरून भाताबद्दल सोजी, भाकरीबद्दल दशमी, पोटभर खाऊन फराळ केला असें ह्मणण्याची चाल पडली! निर्लेप शब्दाचा प्रकार असाच आहे. निर्लेप ह्मणजे ज्यास शिजविण्यास पाणी, मीठ, तिखट, वगैरेंचा लेप लागत नाहीं, अशीं पिकलेलीं केळीं, पेरू वगैरे किंवा नुसत्या दुधांत शिजविलेले किंवा नुसत्या अग्नीवर भाजलेले पदार्थ यांस निर्लेप ह्मणतात. परंतु आतां भाताचे तांदूळ व भाकरीचे दाणे वगैरे पूर्वी भाजले ह्मणजे त्याचे पदार्थ निर्लेप झाले असें समजतात.

१. बदर शब्दास बोर आदेश होतो. व० १—६. २. व०.२—२७.

**बुध्[१]** ( जाणणें ) (प्रा० बुझ्झ् ) बुझणें.

**बुध्न** बुंधा, बूड, बुडखा, बोडखा-का. ( पागोटें वगैरे नसल्यामुळें झाड तोडल्यावर खालीं राहिलेल्या बुडख्याप्रमाणें दिसणारा) बोडणें ( बुडखा करणें ).

**बुस** भूस, भुसा, भुसकट, भुसार.

**बोल** ( औषध ) बोळ.

**भक्त[२]** भात.

**भगिनी** ( प्रा० बहिणी ) बहीण, वन्सें[३], वहिनी[३].

**भज्** ( पूजणें ) भक्ति, भजन=भजणें, भक्त=भगत.

**भज्** (तुकडे करणें ) भाग, भागाकार, भागणें, विभाग, भागी.

**भंज्** (मोडणें) भंग, भंगणें, भंजन, भग्न. भांजणी, भांग ( केसांचा ).

**भट्ट[४]** (विद्वान्) भट, भटजी.

**भंड्** ( कलह करणें )भांडण.

---

१. मराठींत अर्थ वेगळा झाला. व० ८-४८. २. नियम ९ पान १२. ३. भावाची बायको तिला भगिनीसारखी मानावयाची ह्मणून वहिनी असें नांव पडलें. पुष्कळ ठिकाणीं ब आणि व एकमेकांबद्दल येतात. आतां नवऱ्याचे बहिणीस वन्सें ह्मणतात त्याची व्युत्पत्ति अशी दिसते कीं, वन्सें हा शब्द भगिनीसम किंवा वहिनीसम यांपासून झाला आहे, कारण तत्सम=तसें, यत्सम=जसें इत्यादि शब्दांत 'सम्' याचा संक्षेप सें झाला आहे. त्याप्रमाणें वन्सें या शब्दांत 'सें' हा सम् याचा संक्षेप आहे. आणि वन् हा वहिनीचा संक्षेप आहे. देशस्थांत बहुशः वईन्सें ह्मणतात यावरून वहिनीसम=वईन्सें=वन्सें झालें असावें. ४. इंग्रजी राज्यांत अलीकडे विद्यालयें (University) स्थापित होऊन एकाद्या विद्येंत पारंगत होऊन त्यांत त्याची परीक्षा उतरली ह्मणजे त्यास कलास्वामी (M. A.=Master of arts) अशी पदवी मिळते. त्याप्रमाणें पूर्वीं न्याय, मीमांसा, व्याकरण वगैरे विषयांत महापंडित होऊन जे सर्वमान्य, चिरस्थायी, अत्युत्तम असे ग्रंथ लिहीत, त्यांस भट्ट अशी पदवी मिळे. जसें—गदाधर भट्ट, नागोजी भट्ट. पूर्वीं विद्या ब्राह्मणच करीत असल्यामुळें भट्ट अशी पदवी धारण करणारे ब्राह्मणच असत. हल्लीं जशी मोठ्या श्रीमंत अधिकाऱ्यास रावसाहेब वगैरे पदवी मिळाली ह्मणजे त्याच्या मुलांस अंगीं कांहीं पराक्रम नसला तरी लोक रावसाहेब ह्मणूं लागतात; किंवा एखादा यज्ञाची दीक्षा घेऊन दीक्षित झाला ह्मणजे

भण् ह्मणणें, ह्मण.
भद्र भला.
भद्राकरण भादरणें.
भर्त्स् (निंदा करणें) भर्त्सणें, निर्भर्त्सना.
भल्ल् ( हिंसा करणें ) भल्ल= भाला.
भवानी बोहणी.
भस्त्रा भाता.
भक्ष् (खाणें) भक्षणें, भक्ष्य, भक्ष.
भांड भांडें, भाण्ड+अगार =भांडागार, भांडार.

---

त्याच्या कुळांतील सर्वांस दीक्षित ह्मणूं लागतात; त्याप्रमाणें ब्राह्मणांस थोडी बहुत विद्या असली ह्मणजे भट्ट ह्मणण्याची चाल पडली. पुढें उत्तरोत्तर ब्राह्मणांच्या विद्येचा ऱ्हास होत चालला तरी भट्ट हा शब्द चालू राहिला; परंतु पुढें त्याचा एक टकार जाऊन तो जसा रूपानें हलका जाहला तसाच अर्थानेंही हलका जाहला. गुजराथेकडील ब्राह्मणांत विद्येचा अगदींच लोप होऊन ते पाणी भरण्याचें काम करूं लागले त्यामुळें मुंबई वगैरे शहरांत भट ह्मणजे पाणक्या ब्राह्मण इतक्या अर्थावर मजल येऊन पोहोंचली. कालांतराच्या योगानें मनुष्याच्या स्थितींत जसें मोठें अंतर पडतें; तसेंच भाषेंतील शब्दांच्या स्थितींत मोठें अंतर पडण्याचें हें चांगलें उदाहरण आहे.

१. मनुष्य जसा कुसंगतीनें बिघडतो तसेंच कांहीं अंशीं शब्दांचें आहे. चांगल्या अर्थाचे शब्द असतात ते अशिक्षित वाईट लोकांच्या योगानें वाईट होतात. भद्राकरण याचा मूलार्थ मुंडनपूर्वक चौलादिक मंगलसंस्कार करणें असा असून त्यांतील केवळ मुंडनार्थाकडे लक्ष देऊन त्याचा अर्थ नुसते केस काढणें असा केला. त्यांत देखील आणखी निंदा ध्वनित होते. भादरणें हा शब्द बहुश: ह्मैस वगैरे भादरणें अशा ठिकाणीं योजतात. मूळचे चांगल्या अर्थाचे असून आलीकडे वाईट किंवा बीभत्स झालेले असे भाषेमध्यें पुष्कळ शब्द आहेत. कित्येक शब्द मूळचे फारच प्रतिष्ठित असून आतां ते उच्चारण्यास किंवा लिहिण्यास देखील अयोग्य असे झाले आहेत. कोमलतृणवाचक जो कालिदासादिकवींचा आवडता शब्द त्या विचाऱ्यास तर मराठी बोलणाऱ्या चावट लोकांनीं इतका बाटवून टाकला कीं, तो पतित होऊन पुन: शुद्ध होण्याची आशा उरली नाहीं.
२. 'बोहणी' भवानीचें नांव घेऊन विक्री करण्याच्या चालीवरून हा शब्द झाला असावा.

**भार्गी** भारंग, ( एक लहान झाड आहे. )

**भाष्** ( बोलणें ) भाषा=भाक, भाषित=भाकित, भाकणें, भाष्य.

**भास्** भासणें.

**भिद्** ( वेगळें करणें ) भेद, भेदणें, भेग, भित्ति=भिंत, उद्भिज्ज.

**भिक्ष्** (मागणें) भिक्षा, भीक, भिक्षाहारी=भिकारी, दुर्भिक्ष (धान्य न पिकल्यामुळें भिक्षा सुद्धां मिळणें कठीण असा काळ) सुभिक्ष.

**भी** भिणें, भय, भीति, भित्रा, भेसुर, भीम.

**भुज्** भोगणें, भोग, भोजन, बुभुक्षा=( खाण्याची इच्छा ) भूक.

**भू** होणें[1], भूत ( झालेलें ). भविष्य ( पुढें होणारें ). भावना, संभव.

**भूमि** भुई, भूय, भूमिगृह=भूईघर=भुयार.

**भूष्** ( शोभविणें ) भूषण, भूषविणें.

**भृ** ( पोषण किंवा धारण करणें ) भरणें, भरित. भरींव, भरती, भरणी, भर, भार=भारा, भारूड भरणें, संभरेण[2]=सांभारें, सांभाळें, संभाळणें, कार्यभार=कारभार, उद्धार=उभार, उभारणें. भर्ता ( पोषण करणारा ), भ्रतार, भार्या=(पोषण करण्यास योग्य) भौजा[3], भृत्य.

**भृंग** भुंगा.

**भ्रज्ज्** भाजणें, भाजाणी.

**भ्रम्** (फिरणें) भ्रमण, भ्रमणें, भ्रम, भ्रमर=भोंवरा, भोंवणें, भोंवळ, भ्रांति, भ्रांत.

**भ्रातृ** भाऊ, भ्रातृजाया=भावजय.

---

१. वररुचि ८–१ भू धातूस हो आदेश होतो. २. भृ धातूचे पोषण किंवा धारण करणें, असे दोन अर्थ आहेत. तसेंच सम् या उपसर्गाचे दोन अर्थ आहेत, एकत्र करणें किंवा चांगलें करणें. धारणार्थ भृ धातूस एकीकरणार्थ सम् उपसर्ग लागून संभरण शब्द झाला त्याचा अर्थ वेगळाले पदार्थ एकत्र करणें त्यापासून सांभारें शब्द झाला. पोषणार्थ भृ धातूस चांगलें करणें या अर्थाचा सम् उपसर्ग लागून संभार शब्द झाला त्यापासून सांभाळ हा शब्द झाला. ल आणि र यांच्या जागीं ळ पुष्कळ ठिकाणीं होतो. ३. हा शब्द मराठी कवितेंत येतो.

मकर मगर.

मंगल (चांगलें) सुमंगल=सोंगळ, अमंगल=ओंगळ.

मच् (धारण करणें) मंचक, माचा, माची, माचोळी, माच.

मंजरी मंजुरी, मंजुळी.

मठ् (रहाणें.) मठ, मठी.

मज्ज्[1] (बुडी मारणें) उन्मज्जन (वर येणें) उमजणें, उमगणें, संमज्जन=समजणें.

मंड् (शोभविणें) मंडन, मंडण, मांडणें.

मंडक मांडा.

मण्डप=माण्डव.

मंडल (वर्तुळ) मंडळी (मूलार्थ वर्तुल असा असून मंडळी=सभा, असा अर्थ झाला.)

मंडूक बेडूक.

माणिक मडकें.

मत्स्य मासा, मासोळी.

मंथ् (घुसळणें) माथ्या[2], मठ्ठा.

मद् (बेशुद्ध होणें) मत्त, मद्य, माज, माजणें, उन्मत्त=उर्मट.

मधु मध, मधुकर, माधुकरी[3].

मध्य मधला, मधचा, मध्यम, मध्यगृह=माजघर मध्यें[4]=माजी.

मन् (विचार करणें) मन, मानणें, मानीव, मत, अभिमत, मन्या=(गळ्याच्या मागची शीर जी होय ह्मणतेवेळीं हालते ती)=मान.

१. व० ८–६८ मज्ज् धातूस बुड्ड आणि खुप्प असे आदेश होतात बुडणें, डुबणें, खुपणें, यांत मराठींत अर्थभेद झाला. केवळ अर्थसादृश्यावरून हे आदेश मानिले आहेत असें दिसतें, वस्तुतः हे देशी शब्द आहेत. हेमचंद्राच्या कोशांत सांपडतात. २. कोंकणांत घुसळण्याच्या रवीस माथ्या ह्मणतात. ३. मधुकर ह्म० भुंगा जसा प्रत्येक फुलांतून थोडथोडा मध आणितो, त्याप्रमाणें प्रत्येक घराहून अन्न आणितो तो. ४. संस्कृत शब्दांतील 'ध्य' या जोडाक्षरास झ किंवा ज होतो. जसें–वन्ध्या=वांझ, संध्या=ह्मणजे सांज, मध्यें=माजी.

**मनु**[1] ( हिंदूंचा पूर्वज ऋषि ) मनुष्य, माणूस, माणुसकी.

**मया** म्यां (मया हें संस्कृतांत तृतीयेचें एकवचन आहे त्याचाच अपभ्रंश म्यां आहे. )

**मयूर**[2] ( प्रा० मोरो ) मोर.

**मरीच** मिरीं.

**मर्कट** माकड.

**मल्** ( धारण करणें )

**मल** मळ, मळणें, मळीण, मळकट.

**मलिन** ( प्रा० मइल[3] ) मैल, मैला.

**मषी** मशेरी, मस, मसी ( शाई ).

**मस्तक** माथा, मस्तकशूळ= माथाशूळ.

**महत्** ( मोठा ) महंत. महत्तर ( अधिक मोठा ). म्हातारा, म्हातारी.

**महाराष्ट्र**[4] ( प्रा० मरहट्ट ) मराठा, मराठी.

---

१. मनु हा शब्द मन् धातूपासून झाला आहे. त्याचा अर्थ विचारी विद्वान् असा आहे. जें जें मनूचें वाक्य आहे तें तें वेदाप्रमाणें ग्रहण करावें असें वेदवाक्य आहे. इंग्रजी (Man), आंग्लोसाक्सन् (Mann), ड्यानिश (Man), गाथिक (Manna), इत्यादिक यूरोपांतल्या कित्येक भाषेंतले मनुष्यवाचक शब्द परंपरेनें संस्कृत मन् धातूपासून झाले असावे असा तर्क संभवनीय दिसतो. यावरून यूरोपांतले कित्येक लोक परंपरेनें आर्योत्पन्न असून त्यांचा मनु हा पूर्वज असावा व त्यांच्या भाषा परंपरेनें संस्कृत भाषेपासून झाल्या असाव्या असें कित्येकांचें मत आहे. आर्यविद्या-सुधाकर. प्रकाश १ पान ७. २. मयूर शब्दास मोर आदेश होतो. वर० १–८. ३. वर० ४–३१. ४. कित्येक गृहस्थांनीं महाराष्ट्र शब्दाची व्युत्पत्ति आपल्या कल्पनेनें महाराष्ट्र ह्मणजे महारांचा देश अशी काढून हा देश पूर्वी हीन जातीचे लोक महार यांचा असावा व ब्राह्मण वगैरे उंच वर्णांतले लोक मागून त्यांत आले असावे असें पांडित्य केलें आहे. परंतु भाषाशास्त्र व इतिहास या दोहोंचीही पक्की माहिती नसल्यामुळें हा त्यांचा अज्ञानमूलक भ्रम असावा असें दिसतें. कारण, महार वगैरे अगदीं प्राकृत शब्द आणि राष्ट्र वगैरे शुद्ध संस्कृत शब्द यांचा समास बहुश: मराठी भाषेंत होत नाहीं. तसेंच राष्ट्र हा शब्द राज् ह्मणजे शोभणें या धातूपासून झाला आहे. त्याचा अर्थ विद्या कला इत्यादिकांनीं सुधारलेला देश असा आहे.

महारांसारख्या अशिक्षित जातींतील लोकांनीं एखादा देश सुधारला होता असें मानण्यास आधार प्राचीन इतिहासांत कोठें दिसत नाहीं व अशी कल्पना करणेंही सयुक्तिक नाहीं; याकरितां महाराष्ट्र याचा अर्थ मोठें राष्ट्र असून त्यापासून वररुचि वगैरे प्राकृत व्याकरणकारांनीं मराठी शब्दाची व्युत्पत्ति सांगितली आहे तीच खरी असावी.

अलीकडे दक्षिण देशाच्या प्राचीन इतिहासाचा शोध लावण्याकडे विद्वानांचें लक्ष लागलें आहे. त्यांणीं महाराष्ट्र या शब्दाच्या व्युत्पत्तीविषयीं बराच विचार केला आहे. कित्येकांचें असें ह्मणणें आहे कीं राष्ट्रिक हे लोक बहुतकरून महाराष्ट्र देशांतील असावे. कारण, दक्षिणदेशीं पूर्वी रट्ट लोक प्रसिद्ध होते. त्यांच्या एका शाखेंतील लोक आपणांस राष्ट्रकूट असें ह्मणवूं लागले. ज्याप्रमाणें भोज नांवाचे लोक आपणांस महाभोज ह्मणवूं लागले, त्याप्रमाणें रट्टी किंवा रट्ट हे आपणांस महारट्टी किंवा महारट्ट ह्मणवूं लागले. यावरून ते लोक ज्या देशांत रहात होते त्या देशास महारट्ट असें नांव पडलें. त्याचेंच संस्कृतांत महाराष्ट्र असें झालें.

या व्युत्पत्तीवर अशी शंका येते कीं, वररुचि हा ग्रन्थकार प्राचीन आहे, व त्यानें महाराष्ट्री भाषेचें व्याकरण केलें आहे. दक्षिणेंत रट्ट लोक असले तरी ते वररुचीच्या पूर्वीपासून होते असें ह्मणण्यास सबल प्रमाण पाहिजे. दुसरें असें आहे कीं, भरतखण्डांतील देशांच्या व त्यांतील लोकांच्या किंवा राजांच्या प्राचीन नांवाचा विचार केला तर, देशाच्या नांवावरून लोकांस किंवा राजांस बहुतकरून नांवें मिळालेलीं आढळतात. जसें कौरव=कुरु देशाचे. मागध=मगध देशाचे. कौसल=कोशल देशाचे. परंतु लोकांच्या किंवा राजाच्या नांवावरून देशास मिळालेलीं नांवें फारशीं आढळत नाहींत.

आणखी असें कीं, महाराष्ट्र देशाजवळच दुसरा देश आहे, त्यास सुराष्ट्र किंवा सौराष्ट्र असें ह्मणतात. सुराष्ट्र हें नांव सुरट्ट लोकांवरून पडलें आहे असें ह्मणतां येत नाहीं. यावरून असें दिसतें कीं, पूजनार्थक सु आणि महत् हे शब्द राष्ट्र या शब्दापूर्वी लागून या दोन्ही देशांस सुराष्ट्र आणि महाराष्ट्र हीं नांवें पडलीं असावीं. कार्ली वगैरे लेण्यांत महारट्टि शब्द आढळतो तो बहुतकरून महाराष्ट्र शब्दावरूनच झाला असावा.

१. अर्घ ह्मणजे मोल महत् ह्मणजे मोठें आहे अर्घ ह्मणजे मोल ज्याचें तो महार्घ. समर्घ=सवंग.

**मक्षिका** माशी.

**मा** ( मोजणें ) माप, मापणें, प्रमाण, उपमा[1], उपमान, उपमेय, मावणें, मान, निर्माण=निर्मिणें, प्रतिमा.

**माणिक्य** माणिक.

**मातंग** मांग.

**मातुळ** ( प्रा० माउओ ) मावळा.

**मातुलानी** मावळण.

**मातुलुंग** महाळुंग.

**मातृ** ( आई ) (प्रा० माआ). माई, माय, माव, मातृगृह=( प्रा० माईहर ) माहेर, मातृष्वसा ( प्रा० मउसीआ ) मावशी.

**मामक** ( माझा ) मामा.

**माया** ( कपट ) माव.

**मार्कव** माका.

**मार्ग्** ( शोधणें ) मागणें[2]. मोगरा. माग, मार्गे.

**मार्ग** ( प्रा० मग्गो ) मारग, माग, मार्गे, मावारा.

**मार्जार** ( प्रा० मंजार ) मांजर, मांजरी.

**मास** मांस.

**मिथुन** ( प्रा० मिहुण )=मेहूण ( दंपत्य ).

**मिद्** ( चिकट होणें ) मेंदू.

**मिल्** ( भेटणें ) मेळा, मेळ, मिळणें, मिटणें.

**मिश्र्** मिसळणें, मिश्रित, मिसळ, मिसळण, भेसळ.

**मिष्ट** ( रुचिकर ) मिठा, मिठी, मीठ, मिठाई, मिष्टा.

**मुकुट** मुगूट, मुगडी, वुगडी.

**मुक्ता** ( प्रा० मोत्ता ) मोती.

**मुख** (तोंड) मुखवटा, मुसकट, मुख्य ( मुखासारखा) मुखशुद्धि=मुखशुद्ध.

**मुच्** ( सोडणें ) मुकणें; मोकळा, मुक्ति, मोक्ष, मुक्त.

**मुंज** ( मोळ ) मुंज[3], मुंजा.

---

१. उपमा ह्मणजे सादृश्याच्या योगानें तुलना करणें. ज्याची उपमा द्यावयाची तें उपमान, ज्यास उपमा द्यावयाची तें उपमेय. जसें चंद्रासारखें ( आल्हादकारक ) मुख यांत चंद्र हें उपमान व मुख हें उपमेय होय.

२. वस्तु शोधण्याच्या वेळेस दुसऱ्यास विचारावें लागतें त्यावरुन विचारणें इतका मूलार्थाचा अंश राहून याचना करणें हा अधिक अर्थ झाला.

३. उपनयन संस्कारास मुंज ह्मणजे मोळाची दोरी लागते, त्यावरुन सगळ्या संस्कारास मुंज हें नांव पडलें. लग्न शब्दावरील टीप पहा.

मुट् ( मर्दन करणें ) मुटकणें, मुटका, मूटन=बढण, =वोडण=बोडवण.

मुड् मोडणें, मोड.

मुंड मुंडकें.

मुंड् (स्वच्छ करणें, तोडणें.) मुंडन, मुंडणें.

मुद्ग ( प्रा० मुग्गो ) मूग.

मुद्गर ( प्रा० मुग्गरो ) मोगरा, ( लांकडाचा ).

मुद्रा मूद, मुदी.

मुष्टी मूठ.

मुसल मुसळ.

मुस्ता मोथा.

मुह् ( बेशुद्ध होणें ) मोह, मोहणें, मुग्ध, मूढ, मूर्ख, मोहनी.

मुहूर्त[1] (चांगली वेळ) झोतूर.

मूक मुका.

मूत्र् ( पाझरणें ). मूत्र, मूत.

मूल मूळ, मुळी, निर्मूलित= निमूळता.

मूलक मुळा.

मूल्य ( प्रा० मोल्ल ) मोल. अमोल, अमोलिक.

मूषा मूस.

मृ मरण, मरणें, मार, मारका, मारणें, मृत्यु, मृत=मढें, मरु ( मारवाड देशाचें नांव. ज्यांत पाण्यासाठीं माणसें मरतात. ) अमर (देव. ज्यास मरण नाहीं.) अमृत. मर्त्य ( मनुष्य मरणारा. )

मृद् ( कुस्करणें ) मर्दन मर्दणें, मृदु=मऊ. मृत्तिका =माती, मृदुल=मवाळ.

मेधि मेढ.

मेढ्र मेंढा.

यः[2] जो ( बालभाषेंत विसर्गाचा ओ होतो. )

यत् ( उद्योग करणें ) यत्न, झटणें, अयत्न=आयता.

यर्हि जरी.

यव जव.

---

१. संस्कृत कालमानाच्या कोष्टकाप्रमाणें मुहूर्त शब्दाचा मूळचा अर्थ दोन घटका असा आहे. शुभ कार्यास चांगली वेळ पाहण्याच्या चालीवरून मुहूर्त ह्मणजे चांगली वेळ असा अर्थ झाला. पाटाचें लग्न करण्यांत चांगली वेळ पाहण्याचा संबंध असतो ह्मणून त्यापासून झोतूर शब्द झाला.

२. संस्कृत शब्दांतील यकारास ज होतो. जसें—राजा=राया. याप्रमाणें यः व ये यांचीं जो व जे हीं रूपें झालीं आहेत.

या ( चालणें ) यान, प्रयाण, जाणें, यात्रा=जत्रा.

याच् ( मागणें ) याचना याचूआ=यांचा, याचणें.

यातृ जाऊ.

युज् जुळणें, योजना, योग, प्रयोग, योगी=जोगी, जूं, योजणें, योग्य=जोगा, युग =जुग, युगल=जुळें. जुगणें, संयोग=संजोग.

युध् ( लढणें ) युद्ध, योद्धा, आयुध=आऊत, प्रा० झुज्ज=झुंज=झुजणें, योद्धृ= झुंझार[1].

युवन् ( तरणा ) ज्वान, यौवन, ज्वानी.

यू ( मिसळणें ) संयाव=सांजा ( ज्यांत गुळ वगैरे मिसळतात तो. )

यूका ऊ.

यूथ ( मेळा पशूंचा ) जूट, जूटी.

रच् रचणें, रचना.

रज्जु (दोरी) राजु (हा शब्द कोंकणांत प्रसिद्ध आहे.)

रंज् ( रंग देणें ) रक्त=रगत, राता ( तांवडा ) रंग, रंगवल्ली=रांगोळी, राग[2]. रंगविणें, रांग.

रंज् (आनंद देणें) रंजविणें, रंजन=रिझविणें, विरंजन =विरजणें, ( दुधाचें वाईट रूप होणें. )

रट् (शब्द करणें) रडणें, ओरडणें, ओरड.

रथ्या ( प्रा० रच्छा ) रस्ता.

रद् ( फोडणें ) रदन (दांत) रद्दा, रद्द.

रंध् ( शिजविणें, तयार करणें ) रांधणें, रांधा.

रभ् आरंभिणें, आरंभ, प्रारब्ध[3].

रम् रमणें, रमणूक, रमणा. रामा ( स्त्री रमविणारी ). रमणी.

---

१. व० ८—४८. भले झुंझारहि शक्ति जयां मोठी—रघुनाथ पंडित. २. राग ह्मणजे रंग किंवा तांवडेपणा असा अर्थ आहे. मनुष्यास क्रोध आला ह्मणजे त्याचे डोळे वगैरे लाल होतात यावरून त्यास राग आला ह्मणजे क्रोध आला असा अर्थ झाला. ३. या शब्दाचा मूळचा अर्थ आरंभिलेलें असा आहे. एखाद्या मनुष्यास उद्योग वगैरे कांहीं केल्याशिवाय द्रव्यप्राप्ति वगैरे सुख झालें किंवा कांहीं अपराध नसतां दुःख झालें ह्मणजे त्याचें प्रारब्ध चांगलें किंवा वाईट असें ह्मणतात. संसारांत एकाएकीं मनुष्यास कारणाशिवाय सुख

**रश्मि** प्रा० रस्सी, रसी (दोरी)

**रह्** ( सोडणें ) रहित, ई-हाणें ( थांबणें ) रह (एकांतस्थल ).

**रक्ष्** राखणें, रक्षण, राख, ( राखलेली ) अंगरक्षक=आंगरखा, राखणें, राखण, राखोळी, ( गुरें राखण्याची मजुरी. )

**रक्षा** राख, राखाडी.

**राज्** ( प्रकाशणें ) राजा, राया, रावे, राज्ञी=राणी, राजकुल= ( प्रा० राअऊल ) राऊळ, नीराजन=निरांजन.

**राजि** राई, अम्रराजि=आमराई.

**रात्रि** रात्र, अपररात्र=अपरात्र, रात्र=रात.

**राशि** रास.

**राल** राळ.

**रिंग्** ( जाणें ).

---

किंवा दुःख प्राप्त होणें ही ईश्वराच्या दयालुत्वाशीं व न्यायित्वाशीं विरुद्ध दिसणारी गोष्ट सर्व काळीं सर्व देशांत आढळते व तिचें विवेचन अनेक लोकांनीं वेगळालें केलें आहे. कित्येक पूर्वजन्म न स्वीकारणारे असें ह्मणतात कीं, ईश्वर मनुष्यावर आकस्मिक संकटें आणून त्याच्या धैर्यादिक मानसिक गुणांची परीक्षा करितो. हें मत ईश्वराच्या सर्वज्ञत्वाशीं जुळत नाहीं. आमच्या शास्त्रकारांचें असें मत आहे कीं, सुखदुःख हीं पुण्यपापांचीं फळें होत. पुण्याशिवाय सुख व पापाशिवाय दुःख व्हावयाचें नाहीं; असा त्यांचा सिद्धांत आहे. जगांत मनुष्यास आकस्मिक सुखदुःखें प्राप्त होतात; या विरोधाचें समाधान पूर्वजन्म स्वीकारून ते असें करितात कीं, एखाद्यानें मागल्या जन्मीं फार पुण्य किंवा पाप करून त्याच्या सर्व फलाचा उपभोग झाल्याशिवाय त्यास मरण आलें तर त्याचें फल त्यास या जन्मीं प्राप्त होतें, यामुळें कित्येक ठिकाणीं सुखदुःखांचें कारण या जन्मीं दिसत नाहीं तेथें तें प्रारब्ध ह्मणजे पूर्वीच्या जन्मीं भोगण्यास आरंभिलेलें प्राप्त झालें असें समजावें. यावरून प्रारब्ध शब्दाचा अर्थ नशीब असा झाला आहे.

१. विद्याविरहित ह्मणजे ज्याची विद्या सुटली आहे ह्मणजे ज्यापाशीं विद्या नाहीं असा. कांहीं मनुष्यें वाटेनें जात असतां एकादा पूर्वीचे गांवीं थांबला ह्मणजे त्यास मागें राहिला असें ह्मणतात. यावरून राहा धातूचा प्रचारांतील अर्थ उत्पन्न झाला आहे. २. राजा शब्दाचा अपभ्रंश राव शब्द आहे, परंतु मराठींत अर्थसंकोच होऊन तो केवळ सन्मानार्थक झाला.

**रिंगण** (अडखळणें—पडणें.) रिंगणें (खेळणें) रांगणें.

**रिच्** (रिकामें करणें) रिचवणें, रिक्त=रिता, रिकामा, रेच, रेचक, विरक्ति =विरीकत[1]=इराकत.

**रुच्** (आवडणें) रुचि, रुचिकर, रुचणें.

**रुद्** (रडणें) रोदन, रुद्र[2], रौद्र.

**रुध्** (अडथळा करणें) अवरोध, रोधन=रोधणें.

**रुष्** रुसणें, रुसवा, रुष्ट, रोष.

**रुह्** (उगवणें) रुजणें; रोपा, रोप, रोवणें, आरोह, आरोप, रूढि=रूढ.

**रूप्** (दाखविणें) रूप, निरूपण, निरोपण, निरोपिणें.

**रेषा** रेघ, रेखा, रेखाटणें.

**रोमंथ** (प्रा० रोवंथ)=रवंथ.

**रौप्य** रुपें.

**लग्**[3] (संयोग होणें) लग्न, लागणें, लाग, लग, लगा, लग्गा, अलग्न=अलग.

---

१. विराकत शब्द रेच, रेचक, या शब्दांप्रमाणें रिच् धातूपासूनच झालेला असून तो नेहमीं अशिक्षित लोकांच्या तोंडांत असल्यामुळें हलकट शब्दांत त्याची गणना करतात. २. ब्रह्मा, विष्णु, शिव हे तीन देव अनुक्रमें उत्पत्ति, स्थिति, लय करणारे असें मानिलें आहे. शिव हा संहार करणारा ह्मणून त्यास रुद्र ह्मणतात, याचा अर्थ रडविणारा असा आहे. ३. संयोग होणें हा धातूचा मूलार्थ घेऊन खगोलांत मानलेल्या राशिचक्राच्या मेषादि बारा भागांशीं ग्रहाचा योग होणें त्यास ज्योतिषांत लग्न ह्मणतात. विवाहादिसंस्कारांस या लग्नावरून मुहूर्त पाहतात ह्मणून सगळ्या संस्कारासच लग्न असें नांव पडलें. मुंज शब्दाचा असाच प्रकार आहे. ब्राह्मणाच्या उपनयनसंस्कारांत बटूस मुंजांची ह्मणजे मोळाची मेखला ह्मणजे कमरेंतील दोरी करावी लागते त्यावरून सगळ्या संस्कारास मुंज असें नांव पडलें. उपनयन ह्मणजे विद्याभ्यासाकरितां मुलास गुरूकडे पाठविणें, विवाह ह्मणजे विधिपूर्वक कन्या वरून तिला घरीं आणणें अशा अर्थांमुळें शास्त्रकारांनीं त्या त्या संस्कारांस अन्वर्थ नांवें दिलीं, परंतु कालांतरानें ज्या भाषेंत शास्त्रकारांनीं ग्रंथ लिहिले तिचा अभ्यास कमी होऊन अज्ञान वाढत चालल्यामुळें संस्कारांचें खरें बीज किंवा तत्व लोकांच्या मनांतून नष्ट होऊन मुख्य गोष्टी एकीकडेसच राहिल्या आणि भलत्याच गोष्टींस प्राधान्य आलें. उपनयनसंस्कार ह्मटला ह्मणजे ज्या

**लगुड** ( दंड ) लांकूड.

**लघु** लहान लाघव ( लहानपणा ) लाघवी[२] लघ्वी[३].

**लंघ्** ( उपवास करणें, पार जाणें ) उल्लंघन=उल्लंघणें, लंघन=लंघणें.

**लज्** (भाजणें) लाजा=लाह्या.

**लज्ज्** लाजणें, लज्जा, लाज=निर्लज्ज=निलाजरा.

**लड्** ( लाड करणें ) लळा, लाड, लाडका, लडका.

**लड्डू** लाडू.

---

गुरूकडे विद्याभ्यासाकरितां मुलगा जाईल त्यानें करावयाचा. बाप विद्वान् असून त्यानेंच मुलाकडून विद्याभ्यास करविल्यास त्यानें करावा. अशामुळें बाप ठोंबा असला तरी त्यानेंच मुंज केली पाहिजे अशी चाल पडली. विद्येचें अक्षर न आलें तरी हरकत नाहीं, परंतु अक्षत मोठी काढणें, भिक्षवाळ मिरविणें, नाच करणें वगैरे गोष्टी घर गहाण ठेवून सुद्धां झाल्याच पाहिजेत, अशी स्थिति झाली. यावरून लक्षांत येईल कीं, भाषेच्या ऐतिहासिक अभ्यासापासून भाषेंतील फेरफार कळतात, इतकेंच नाहीं, तर त्यापासून आचार, विचार इत्यादिकांच्या संबंधानें जें लोकांमध्यें स्थित्यंतर होतें तेंही समजतें. प्राचीन कालाप्रमाणें क्षत्रिय व वैश्य वेदशास्त्र ह्मणणारे असते तर उपनयनसंस्कारास मुंज असें नांव पडलें नसतें. कारण, त्यांच्या उपनयनास मेखला मुंजाची नसून दुसऱ्या प्रकारची आहे. परंतु त्या जाती नष्टप्राय झाल्यामुळें मेखलेची गरज केवळ ब्राह्मणांसच राहिली तीवरून मुंज शब्द सुरू झाला.

१. लघु याचें लहु असें रूप होऊन यांतील व्यंजनाचा विपर्यय होऊन हळु शब्द झाला असें कित्येक विद्वानांचें मत आहे. २. चित्रें काढणें, नक्षीचें काम करणें वगैरे कुशलतेचें काम करण्यास हात हलका असावा लागतो, य गुणास हस्तलाघव असें ह्मणतात, याचा अर्थ हस्तकौशल्य. यावरून लाघव शब्दाचा अर्थ कौशल्य असा झाला. लाघव ज्यास आहे तो लाघवी ह्मणजे दुसऱ्याचें मन वळविण्यास चतुर असा अर्थ झाला, त्यावरून गोड बोलून काम करून घेणाऱ्या मनुष्यास 'तो मोठा लाघवी आहे' असें ह्मणतात. ३. लघुशंका हा शब्द प्रसिद्धच आहे. संस्कृतांत उकारांत स्त्रीलिंगी विशेषणाचीं रूपें; मृदु, मृद्वी अशीं दोन प्रकारचीं होतात, त्याप्रमाणें लघ्वी हें शंकाशब्दाचें विशेषण असल्यामुळें सगळ्या शब्दाबद्दल त्याचा नामाप्रमाणें उपयोग करण्याची चाल पडली. विरक्त किंवा विराकत हा शब्द हलकट ठरल्यावर हा शब्द प्रचारांत आला असावा.

लत्ता लाथ.

लंपट लांपट[1].

लंब् लोंबणें. लोंब. अवलंब =ओळंबा. लोंवणें. लोंबर ( साळीचें कणीस ).

लभ् (मिळणें) लाभ, लाहणें, लाधणें. लाभणें, लाहो.

ललाट ( प्रा० णिडालं ) निढळ वररुचि ४—३३-)

लवण[2] (मीठ) लोण, लोणा, लोणचें, अलवण=अळणी

लवन (कापणें) लवणें. लवचिक.

लशुन लसूण.

लक्ष (१,००,०००,) लाख.

लक्ष् ( पहाणें, खूण करणें ) लक्ष्य, लक्षण, लक्षिणें. उल्लक्षण=ओळखणें.

लहरी ( लाट ) लहर.

लांगल नांगर.

लालसा लालची, लालूच.

लाला लाळ.

लाक्षा लाख.

लिख् लिहिणें, लेखणी, लिखित, लेख, लेखक, उल्लेख.

लिंग् ( खूण करणें ) लिंग ( चिन्ह ) आलिंगन, आलिंगिणें.

लुञ्च् ( दूर नेणें, चोरणें ) लुच्चा.

लिप् लिंपणें, निर्लेप, लेप, लित, लेपटणें, लपेटा, लिपि[3].

लिक्षा लीख.

लुट् लोटणें, लोटा.

---

१. लंपट ह्मणजे आसक्त. जसें, विषयलंपट, विषयासक्त, ह्मणजे विषयांत चिकटून राहणारा यावरून लांपट ह्मणजे चिवट असा अर्थ झाला. २. लवण शब्दांत लोण आदेश होतो. व० १—७. ३. लिपि हें वर्णमालेचें नांव आहे यावरून त्याचा अर्थ कागद वगैरे पदार्थांवर शाईचा लेप करून काढलेलीं अक्षरें असा आहे हें उघड आहे. यावरून कर्नाटकांत जाड ताडपत्रावर अणकुचीदार लोखंडाच्या काडीनें लिहिण्याची वहिवाट आहे तीच प्राचीन आहे; शाईचा उपयोग मागाहून करूं लागले असें कित्येकांचें मत आहे तें निराधार ठरतें. लिपि हा शब्द पाणिनीच्या अष्टाध्यायींत आला आहे. कागदांच्या पूर्वी पानांवर लिहीत होते ह्मणून पुस्तकांचीं पानें किंवा पत्रें असें ह्मणण्याचा संप्रदाय पडला. लिखधातूचा अर्थ खुणा करणें असा आहे. पानांवर खुणा करून लिहिण्याची

लुठ् लोळणें, लोंढणें.
लुंठ लुटणें, लुटारू.
लोक् ( पाहणें ) अवलोकन=अवलोकणें.
लोमन् लंव, लोंकर.
लोल (चंचल, हालणारा) लुला, लोला, लुळा, लोलक.
लोहखंड लोखंड, लोहकार =लोहार.
वंक् वांकणें, वांक, बांक, वक्र, वांकडा.
वच् (बोलणें) वाचणें, वाचा, वचन, वाचन, वाक्य.
वट् (विभागणें) वांटणें, वांटा.
वट वड.
वटक वडा.
वठ् ( लठ्ठ होणें ) वठ्या.
वणिक् ( विकणारा ) वाणी.
वत्स[1] वासरू, बच्चा.
वत्सनाभ बचनाग.
वद् ( बोलणें ) वाद, संवाद, वादी, प्रतिवादी. वाद्य, वाजवणें.
वन्द् ( नमन करणें ) वन्दन वन्दिणें.
वंध्या वांझ, वांझोटी.
वन् ( मागणें ) वाण (कमीपणा ).
वन बन वनचर=वंजारी.
वप् ( पेरणें ) वाफा, वाफ, धुळवाफ, वापसा.
वम् (ओकणें) वांति, वमन, उद्वमन=उमळणें.
वर ( चांगला ) बरा, वर + अन्न=वरान्न=वरण.
वराट ( दोरी ) वरात ( हा शब्द कोंकणांत प्रसिद्ध आहे. ) चऱ्हाट.
वर्कर ( तरुण पशु ) ( प्रा० वक्करो ) बकरा ( मराठींत फक्त बोकडाचाच वाचक झाला ).
वर्ण (रंग) वाण ( लुगड्याचा वगैरे ).
वर्ण् ( प्रशंसा करणें ) वर्णन=वानणें.

---

चाल शाईनें लिहिण्याच्या पूर्वीची असती तर अक्षरसमूहाचें नांव 'लिपि असें न पडतां ' लिखि ' असें पडलें असतें. अक्षरवाचक जो वर्ण शब्द त्यावरूनही उदकांत कोणत्या तरी प्रकारचा रंग मिसळून अक्षरें काढण्याची वहिवाट फार प्राचीन आहे हें स्पष्ट होतें. शाईनें लिहिण्याचा परिपाठ नसता तर ताडपत्रावर कोरलेल्या अक्षरांस वर्ण असें नांव पडलें नसतें.

१. बच्चा हा शब्द हिन्दुस्थानी भाषेंत फार येतो परंतु तो वत्स याचाच अपभ्रंश आहे.

**वर्तिका** वात, बत्ती.

**वर्तुल** वाटोळें.

**वर्धि** (प्रा० वद्धी)=वादी (कातड्याची ).

**वल्** ( गुंडाळणें ) वळणें, वळी, आवळणें, वळें. वलन=वळण, उद्वलन=ओंवाळणें.

**वल्कल**[1] वाकळ.

**वल्ग्** ( चालणें ) वल्गना, वळघणें.

**वल्लि** वेल.

**वंश** वांसा, बांस.

**वस्** ( रहाणें ) बसणें, वसाहत, वसति=वस्ती. वस्तु, वस्त, वास्तु ( घर. )

**वस्** ( आच्छादन करणें ) वस्त्र, बासन.

**वह्** ( नेणें ) वहन, वहाणें, वाहिनी, वाहन, निर्वाह =निभाव, निभावणें, प्रवाह, विवाह, वधू.

**वा** (वहाणें) वात, वायु, वारा, वावटळ, निर्वात=निवांत.

**वाचाट** ( बडबड्या ) चावट, चांट.

**वांछ्** ( इच्छिणें ) वांछा, वांछिणें.

**वाट** वाडा.

**वाटिका** वाडी.

**वाणी** बोलणें, बाणी[2].

**वामलूर** वारूळ.

**वानर** वांदर.

**वापी** (विहीर) बाव, बावडी.

**वार**(टाळणें) वारणें, निवारणें[3].

**वालुका** वाळू.

**विकट** बिकट.

**विकल** (निस्तेज) विकळणें ( वाईट होणें ).

**विकसन** विकसणें, विकास.

**विडंबन** ( अनुकरण ) वेडावणें.

**वितस्ति** वीत.

---

१. वल्कल शब्दाचा अर्थ झाडाच्या सालीचें वस्त्र असा असून वाकळ याचा फाटकें वस्त्र असा अर्थ झाला. २. वांकडें पडून भांडूं लागला म्हणजे बाणीवर आला असें म्हणतात. ३. हें क्रियापद मरणें या अर्थी मराठींत भूतकाळीं मात्र येतें. जसें—तो मनुष्य वारला. परंतु कर्ज वारणें अशा ठिकाणीं अर्थांतर होऊन तिन्ही काळीं चालतें.

**विद्**[1] ( जाणणें ) वेद, विद्या, विद्वान् (जाणणारा) निवेदन=जाणविणें=सांगणें. वेदना ( दुःख )=वेणा.

**विद्युत्** वीज, विजली.

**विरल** विरळ, विरळा.

**विश्** ( शिरणें ) प्रवेश, प्रवेशणें, प्रविष्ट, समावेश=सामावणें.

**विंशति** ( प्रा०वीसा ) वीस.

**विष** वीख, विषारी=विखारी, विषार=विखार.

**वी** (प्रसवणें) विणें,वीण, वेत.

**वीजन** विंझणा.

**वीर्य** ( सत्व ) विरी. (पदार्थ निस्तेज झाला ह्मणजे त्याची विरी गेली असें ह्मणतात. )

**वृ** वरणें वर=बरा. आवृ (वेष्टन करणें ) आवरणें, आवार, संवरण=सांवरणें. प्रावरण ( प्रा० पंगुरण ) पांगरुण.

**वृज्** (सोडणें) वर्जिणें, वर्ज्य.

**वृत्** ( होणें ) वर्तन, वर्तणें. वृत्त, वृत्तांत, वर्तमान, वार्ता, बात, बातमी.

**वृध्**[2] वाढणें, वृद्धि=वाढ,वाढावा, चक्रवृद्धि=चक्रवाढ, वर्धन=वाढणें, वृद्ध (प्रा० वड्ढो) बडा, बुड्ढा. वडिल.

**वृश्चिक**[3] ( प्रा० विच्छुओ ) विंचू.

**वृष्** ( पाउस पडणें ) वृष्टि, वर्षाव, वर्षण, वर्ष[4], वार्षिक[5], प्रावृष्=पाउस, वर्षर्तु =बरसात.

**वृक्ष**[6] ( झाड ) रूख, ( प्रा० रुख्ख).

---

१. मनुष्य सुखांत असला ह्मणजे त्याचा काल केव्हां जातो तें समजत देखील नाहीं. परंतु दुःखांत असला ह्मणजे प्रत्येक क्षण त्यास समजत असतो यावरून वेदना ह्मणजे जाणवित्ये ती ह्मणजे दुःख असा अर्थ झाला. मराठींत अर्थसंकोच होऊन वेणा शब्दाचा अर्थ प्रसूतिवेदना असा झाला. २. वररुचि ८—४४ वृध् धातूच्या धकारास ढ होतो. ३. वररुचि १—१५. ४. मृगसाल ह्मणजे मृगनक्षत्र लागण्याचे वेळेस वर्ष लागलें असें मानण्याची वहिवाट असे त्यावरून सर्व संवत्सरास वर्ष ह्मणण्याची चाल पडली. कारण, त्या वेळेस दुसरा पावसाळा सुरू होतो. ५. वार्षिक याचा अर्थ पर्जन्यकाळीं होणारें असा असून प्रतिवर्षी होणारें असा झाला. ६. वररुचि १—३२.

**वे** विणणें, वेणी, वीण, विणकर.

**वेणु** वेळू.

**वेतस** वेत, वेताटी.

**वेला** वेळ.

**वेश्या** वेसवा.

**वेषवार** वेस्वार (हा पदार्थ कोंकणांत प्रसिद्ध आहे, तो मेथकुटासारखा असतो.)

**वेष्ट्** (गुंडाळणें) वेष्टन=वेढणें; वेढें (पायांतील) वेढा[1]. वेटाळणें, वेटाळें.

**वैराग्य** (विषयोपभोगापासून निवृत्त होणें) बैरागी.

**व्यंग** बिंगें, बींगा, विंग.

**व्यध्** (ताडन करणें) व्याधि, विंधिणें, अविंध, व्याध.

**व्यय्** (खर्चणें) वेंच.

**व्याघ्र** वाघ.

**व्यापार** (हालचाल) वापर, वापरणें.

**व्रण** वण (जखम).

**व्रात** (समुदाय) वरात (वरातीच्या वेळेस पुष्कळ लोक मिरवण्यास जातात).

**शक्** (सामर्थ्य असणें) शकणें, शक्ति.

**शंक्** (संशय घेणें) शंका, शंकिणें.

**शकट** (गाडी) छकडा.

**शकटी**[2] शेगडी.

**शठ** (लुच्चा) छट, खष्ट, खट, शठकर्म=खटकर्म.

**शप्** शापणें, शाप, शपथ. =(खोटें बोललों तर अमुक शाप होईल असें ह्मणणें).

**शंबर** सांबर.

**शब्द** (प्रा० सद्द) साद. प्रतिशब्द=पडसाद.

**शम्** शमणें, शांत=सन्थ, शान्ति.

**शर्करा** साखर.

**शलाका** सळई.

**शल्य** सल, सलणें.

**शश्** (उडी मारणें) शश=ससा.

**शाका** शाख.

**शाटी** छाटी.

**शारदा** (सरस्वती) सारजा.

**शाळा** साळ, शालाशुद्ध=साळसूद.

---

१. वररुचि ८—४० वेष्ट धातूच्या 'ष्ट' च्या जागीं ढ होतो.
२. संस्कृतांत अंगारशकटी असा शब्द आहे.

**शाली** साळी, साळ.
**शाल्मली**=सांवरी, शेंवरी.
**शाव** छावा.
**शास्** (नियमन करणें) शास्त्र[1] शास्ता, शासन, शिष्य[2]=शिष्या.
**शिक्य** शिकें.
**शिखंडक** (झुलपें) शेंडी.
**शिग्रु** शेगवा, शेवगा.
**शिथिल** सईल, सैल (प्रा० सिढिल किंवा सढिल) सढळ, ढिला.
**शिंबा** शेंग.
**शिरा** शीर.
**शिला** शीळ.
**शिंशपा** शिसवा.
**शिष्** (उरणें) शेष, अवशिष्ट=ओशॅट[3], ओखटा, उच्छिष्ट=उष्टें.
**शिक्ष्** शिक्षण[4]=शिकणें, शिक्षा, शिक्षक.
**शी** (निजणें) शयन, शय्या=शेज[5], सेज.
**शीतल** शितळ, शितळाई.
**शुंठि** सुंठ.
**शुंडा** सोंड.
**शुध्** (पवित्र होणें) शुद्ध=सुधा अन्नशुद्धि=अनशूद.
**शुभ्** शोभणें, शोभा.
**शुल्ब्** (मोजणें).
**शुल्ब** (दोरी) सुंभ.
**शुष्** (वाळणें) शुष्क=सुकणें, सुका, शोष=सोख=सोस.
**शून्य** सुनें, सुणें.
**शूर्प्** (मोजणें) शूर्प=सूप.
**शूल** (पीडा, दुःख होणें) सूळ. जसें–पोटसूळ.
**शूल**, सूळ, सुळा, सुळका–की.
**शूर्प** सूप.
**शृंखला** सांखळी, उच्छृंखल=उत्संगळ=उत्संखळ (बंधन ज्यास नाहीं तो).
**शृंग** शिंग.
**शेप** शेंपूट.
**शैवाल** शेवाळ–ळें.

---

१. पुष्कळ उदाहरणें नियमित करणारे नियम ज्यांत सांगितले आहेत तें. २. नियमन करण्यास योग्य एवढा मूलार्थ असून मराठींत शागीर्त असाही अर्थ झाला. ३. धुवून टाकल्यावरही ज्याचा शेष उरतो त्यास ओशट ह्मणतात. ४. दंड झाला ह्मणजे असें करूं नये असें समजतें यावरून दंडास शिक्षा ह्मणतात. ५. नियम २ पान ११.

**श्रम्** ( दमणें ) श्रम, विश्रांति, विश्राम=विसावा.
**श्रि** (साहाय्य करणें-घेणें) आश्रय=आसरा-आश्रित.
**श्रु** ( ऐकणें ) श्रवण, श्रुति[1], परिश्रवण=परिसणें, सुनावणें.
**श्रेणि** ( ओळ ) श्रेढी.
**श्रेष्ठिन्** (वाणी)शेट, शेटजी.
**श्यामल** सांवळा.
**श्यामाक** सांवे.
**श्याल** ( मेहुणा, बायकोचा भाऊ ) सेला[2].
**श्वशुर** सासरा, सासरें.
**श्वश्रू** सासू.
**श्वस्** ( श्वास घेणें ) श्वास, विश्वास, उच्छ्वास,उसासा.
**श्वापद** (प्रा०सावद)=सावज.
**षष्** सहा षट्क=छक्का, छकडी.
**षड्ज** खर्ज(गायनांतील स्वर.)
**षष्टि** साठ.
**षोडश** सोळा.
**संकट** सांकडें.
**सकळ** सगळें, विसकळणें, विसकटणें.
**सक्तु** सातु.
**सखि** सखा, सख्खा.
**सज्ज** (तयार) सजणें, साज.
**सज्जन** ( चांगला मनुष्य ) साजणी, सजणा[3].
**सत्य** ( प्रा० सच्च ) साच, सत्यकार=सचकार.

१. जिच्या योगानें धर्म ऐकूं येतो ( समजतो ) ती श्रुती, असा श्रुति शब्दाचा मूलार्थ आहे. वेदमंत्र ह्मणण्याच्या वेळेस पाठकाचे चित्ताची एकाग्रता राहून अर्थानुसंधान राहावें ह्मणून पुस्तकावरून पठण करण्याचा निषेध शास्त्रकारांनीं केला आहे. ऐकून ह्मणणें यावरून वेदास श्रुति हें नांव पडलें, व श्रुति शब्दावरून प्राचीन कालीं लेखनकला भरतखंडांत नव्हती, अशीं अनुमानें यूरोपांतील विद्वान् करतात तीं बरोबर नाहींत. या प्रमाणेंच वेदार्थाचें स्मरण करून त्यांत प्रतिपादित केलेल्या धर्माचें ऋषींनीं विस्तारानें ज्यांत कथन केलें आहे, असे जे ग्रंथ त्यांचें नांव स्मृति. असा स्मृतिशब्दाचा अर्थ प्राचीन संस्कृत ग्रन्थकारांनीं केला आहे. याकरितां स्मृति ह्मणजे केवळ स्मरणानें पढण्याचे ग्रन्थ असा अर्थ करून स्मृतिकालींही भरतखंडांत लेखनकलेचा अभाव होता असें ह्मणणें निराधार आहे. कारण स्मृतींमध्यें न्यायसभेंत मानण्याचीं प्रमाणें सांगितलीं आहेत, त्यांत लेख प्रमाण धरलें आहे. २. हा शब्द आतां शिव्या देण्यांत मात्र योजतात. ३. हा शब्द लावणी वगैरे हलकट कवितेंत येतो.

**सद्** ( नाश पावणें ) सडणें, उत्साद=ओसाड–डी.

**सद्यः** सध्यां.

**संधान** सांधणें.
**संधि**(जोडणें)सांधा,सांधी.
**संध्या** (प्रा०संजा ) सांज[1], सांजावणें, हे शब्द सम् ( एकत्र ) हा उपसर्ग आणि धा ( ठेवणें ) धातु यांपासून झाले आहेत.

**सपत्नी** सवत, सापत्न=सावत्र.

**संपुट** संपुष्ट.

**सप्तति** ( प्रा० सत्तरी )सत्तर.

**सप्तन्** सात.

**सप्तविंशति** सत्तावीस.

**सप्तपर्ण** ( एक झाड आहे ) सातवण ( याच्या पानाचे सात तुकडे असतात ).

**संप्रति** सांप्रत.

**सरट** सरडा.

**सर्व** (प्रा० सब) सारा, सब ( हिंदुस्थानींत येतो ).

**सर्षप** शिरस.

**सांत्व्** (समजूत करणें ) सांत्वन, सांत्विणें, शांतवन.

**साध्** (पूर्ण करणें,मिळविणें,) साधन=साधणें, साधु=( प्रा० साहू ) साव.

**सामाजिक** समाईक.

**सार** ( तत्त्व, झाडाचे आंतील गाभा ) साड.

**सार्थ** (समूह) साथ, साथी.

**साक्षिन्** साक्षी, साक्ष.

**सिक्थ**[2] शीत.

**सिच्** शिंपडणें, अभिषेक, शिंपणें, अभिषेचन=भिजणें.

**सिंदूर**=( प्रा० सेंदूर ) शेंदूर[3].

**सिध्** ( तयार होणें ) सिद्ध, सिद्धि, शिधा.

**सिध्मन्** शिबें.

**सिव्** शिवणें, शिवण, शिंपी, निसवणें, उसवणें.

**सीमा** ( शेवट ) शींव, सीमोल्लंघन=शिलंगण.

**सीस** शिसें.

---

१. संध्या हा शब्द सम् उपसर्गपूर्वक 'धा' धातूपासून झाला आहे. त्याचा अर्थ सांधणारी ह्मणजे रात्र आणि दिवस या दोन कालांच्या विभागांस जोडणारी वेळ असा आहे. हेमचंद्र ८–२१०. २. वररुचि ३–१. ३. वररुचि १–१२.

सु ( बाळंत होणें ) प्रसव=पसवणें, पसव, सुईण, सुत, सूनु (पुत्र), सुतक[1].

सुमंगल सोंगळ.

सुवर्ण सोनें, सुवर्णकार=सोनार.

सूकर डुकर.

सूच् सुचणें, सुचविणें, सूचना.

सूचि सुई.

सूत्र सूत, सुताडा.

सृ सरणें, सरणी, प्रसार, पसारा, पसार, पसा, अवसरण=ओसरणें, प्रसरण=पसरणें, निःसरण=निसरणें, निसरडें, उत्सरण=उसळणें.

सृप् सरपटणें, सर्प=साप. उत्सर्पण=उपसणें, उपसा.

सेव् ( चाकरी करणें ) सेवा, सेवक, सेवन, सेवणें.

सौराष्ट्र सोरट[2].

स्कंध खांदी ( झाडाची ).

स्कंध खांदा.

स्खल् ( अडथळणें ) स्खल-

---

१. मागें सांगितल्याप्रमाणें शब्द पहिल्यानें चांगल्या अर्थाचा वाचक असून मागून त्याचा वाईट अर्थ झाल्याचें सुतक हा शब्द उदाहरण आहे. जनन व मरण या दोन्ही काळीं बांधवांस अशुचित्व सांगितलें आहे. त्यावरून प्रथमतः जननाशौचास सुतक असें नांव पडलें. शास्त्रांत जाताशौच व मृताशौच अशीं दोन नांवें आहेत. कालांतरानें जाताशौचास मराठींत सोहेर असें नांव पडून मृताशौचास सुतक असें नांव पडलें. दोन्ही प्रकारच्या अशौचांत कर्मानधिकार सारखाच आहे; तथापि जनन हें आनंदकारक असल्यामुळें जाताशौच मंगलप्रद आहे याकरतां त्यांत स्पर्शदोप नाहीं. मृताशौच दुःखकारक असल्यामुळें तें अमंगळ मानिलें आहे. बिचारा सुतक शब्द मंगलप्रद अशुचित्वाचा वाचक असून त्यास अज्ञान लोकांनीं अमंगळ जें मृताशौच तद्वाचक केलें. अमक्यास सुतक आलें आहे ह्मणजे मृताशौच आलें आहे असें समजतात. नशीब बिचाऱ्या शब्दाचें. ४. व० २—२. २. सुराष्ट्र किंवा सौराष्ट्र ह्मणजे चांगला देश, हें गुजराथ देशाचें नांव आहे. तिकडील स्त्रिया व पुरुष यांमध्यें चावटपणा विशेष असल्यामुळें इकडेही तसा चावटपणा करणाऱ्यांस सोरट हें नांव पडलें असावें.

न=खळणें ( थांबणें. ) खळी, खळें.

**स्तन** ( प्रा० थण ) थान, तान्हा ( स्तन पिणारा ).

**स्तंब** ( धान्याचा बुडखा ) थोंब, ठोंब.

**स्तंभ्** ( उभें राहणें ) स्तंभ[1]= ( प्रा० खंबो ) खांब, स्तंभन=थांबणें, उत्तंभन= ओथंबणें.

**स्तु** स्तविणें, स्तवन, स्तुति, स्तोत्र.

**स्तॄ** ( पसरणें ) आस्तरण= हंतरणें, हंतरूण, हंतरी, अंथरूण. स्तर=थर. प्रस्तर=पथारी, फत्तर, पाथर.

**स्तोक** थोकडें=थोडकें, थोडें.

**स्था** ( राहणें ) स्थिर=थीर, थिराई, स्थान=ठाणें, ठाव, ठाय, ठेला, थारा, स्थापन=ठेवणें, ठेव, ठेवा, प्रस्थापन=पाठविणें, संस्थापन=सांठवणें. संस्थान=सांठणें, सांठा, उत्थान=उठणें. उत्थापन=उठवणें, स्थापक= स्थाईक. स्थविर ( वृद्ध ), स्थावर ( राहणारा ) ( प्रा० स्थेर ) थेरडा. स्थाली, थाळी, थाळा, स्थूल[3] ( प्रा० थोर ) थोर.

**स्ना**=( आंग धुणें ) स्नान, ( प्रा० न्हाण ) न्हाणें[4], न्हाणी, निष्णात[5].

**स्नुषा** ( प्रा० सोण्हा=सूण्हा ) सून.

**स्पंद्** ( हालणें ) फुंदणें.

**स्पृश्** स्पर्शिणें, स्पर्श.

**स्फुट्** ( प्रा० फुट्ट ) फुटणें. स्फुट=फूट, फुटाणा, स्फोट=फोड, स्फोटन=फोडणें, स्फोटक= ( प्रा० खोडाओ )=खौडा.

**स्फुर्** फुरफुरणें स्फुरण=फुरण, फुरफुर.

**स्फुलिंग** फुणगी.

**स्मशान** ( प्रा० मसाण ) मसण, मसणवटी.

---

१. वर० ३—२४ स्तंभ शब्दाच्या स्तस ख आदेश होतो. २. वररुचि ८—२५. ३. हेमचंद्र १—२२५. ४. रजोदर्शन प्राप्त झालें असतां लज्जेनें शिवूं नको, विटाळ झाला आहे. स्नान करावयाचें आहे. अशा ह्मणण्याचे चालीवरून रजोदर्शनास न्हाण असें ह्मणतात. ५. शास्त्रांत निष्णात ह्मणजे शास्त्रांत बुडालेला ह्मणजे प्रवीण.

स्मृ स्मरणें, स्मृति[1], स्मरणी, स्मरण, विस्मरण=विसरणें.

स्वयं (स्वतः) स्वयें, स्वयंवर=सैंवर, स्वयंपाक=सैंपाक.

स्वर सूर.

स्वाद् (रुचि घेणें) स्वाद, स्वादु, आस्वादणें, स्वादिष्ठ.

हट्ट (बलात्कार करणें) हट्ट, हट्टी.

हट्ट (बाजार) हट्टी, हाट (बाजार).

हन् (मारणें) हनन, हाणणें, हत्या, हत्यार, घाय, घाव, घात, घाला, घण (लोहाराचा.)

हनु हनुवटी.

हरिद्रा[2] हळद (प्रा० हलद्दा).

हरीतकी (प्रा० हरडई) हरडी, हरडा, हिरडा.

हरिमंथ हरभरा.

हल[3] (नांगर) हल्या, (नांगर ओढणारा) हेला.

हस् हंसें, हंसूं, हंसणें, हंसरा.

हस्त (प्रा० हत्थो) हात, हात्त्या, हस्तक, तलहस्त=तळहात.

हस्तिन्[4] हत्ती.

हा (टाकणें) हानि, हीन (टाकलेला) हीण.

हार्द (हृदयांतील) हरिद्र.

हिंगु हिंग.

हिंड् हिंडणें.

हिम हिंव, हिमालय=हिंवाळा.

हीरक हिरा.

हुड् (स्वीकारणें) हुंडी, हुंडा (जो दिला असतां मुलगी स्वीकारतात तो).

हृ (चोरणें) हरणें, हरवणें, प्रहार (मारणें)=पाहार.

---

१. श्रुति शब्दावरील टीप पहा. २. व० १—१३. हरिद्रादि शब्दांच्या इकारास अ होतो व० २—३०. रस ल होतो. ३. टोणग्यास हल्या ह्मणतात यावरून प्राचीनकाळीं शेतकी सुरू होण्याचे वेळेस टोणग्यास नांगरास लावीत असत असें दिसतें. नांगरास बैल लावण्याची चाल मागून पडली असावी. ४. संस्कृतांत अकारांत नामांस इन् प्रत्यय लागून तें ज्यास आहे अशा अर्थीचीं विशेषणें होतात. जसें—हस्त ह्मणजे सोंड ज्याला आहे तो, हस्तिन्=हस्ती=हत्ती. या इन् प्रत्ययांत विशेषणास इ प्रत्यय लागून स्त्रीलिंगी रूप होतें. जसें—हस्तिनी=हत्तीण. हा जो स्त्रीलिंगी विशेषणाचा इनी प्रत्यय त्यापासून मराठींतील स्त्रीलिंगाचा ईण प्रत्यय झाला आहे.

अपोहर=पोहरा (अप्=पाणि, हर=हरण करणारा) हार (खेळांतील पराजय) विहार (क्रीडा) =बहार.

हृदय[1] (अंतःकरण) हिय्या.

हृष् (आनंद पावणें) हर्ष=हरिक—ख. हृष्ट.

हेतु हेत.

होड् (जाणें, ओढणें) अवहोडन=ओहोट—टी. होडी.

होलिका होळी.

ह्लाद् (आनंद पावणें) आल्हाद, आल्हादणें.

ह्वल् हालणें, विव्हल, विवळणें.

क्षण् (जखम करणें, मारणें.) क्षत=खत.

क्षण (उत्सव) सण.

क्षर् (गळणें, पाझरणें) क्षार =खार, खर.

क्षल् (धुणें) प्रक्षालन=पाखडणें. आक्षालन=आवळणें.

क्षि[2] (प्रा० झिझ) झिजणें.

क्षिप् (फेंकणें) क्षेप=खेप.

क्षीर (दूध) खीर.

क्षुद् (पीठ करणें) खोदणें.

क्षुभ् (रागावणें) क्षोभ, क्षोभणें.

क्षुल्लक (वाईट) खुळा.

क्षेत्र शेत—ती, खेत—ती.

ज्ञा[3] (प्रा० जाण्) जाणणें, ज्ञाता, जाणता, सुज्ञान=सुजाण, अज्ञान=अजाण, अजाणता, जाणीव. अज्ञानी = अडाणी = अनाडी. आज्ञा=आण (शपथ असा अर्थ झाला).

---

१. मूळचा अर्थ अन्तःकरण असा असून हिय्या ह्मणजे धैर्य असा अर्थ झाला. २. वररुचि ८—३७ क्षि धातूस झिझ आदेश होतो. ३. वररुचि ८—२३ ज्ञा धातूस जाण आदेश होतो.

## प्रसिद्धसंस्कृतधातुकोश.

### अ

अंच् जाणें.
अट् भटकणें ( पर्यटन ).
अट्ट् अनादर करणें.
अण् वांचणें.
अत् सतत गमन करणें ( आत्मा ).
अद् खाणें.
अन् वांचणें ( प्राण).
अर्च् पूजा करणें ( अर्चा ).
अर्ज् संपादन करणें.
अर्द् पीडा करणें.
अर्ह् पूजा करणें.
अल् शोभविणें.
अव् रक्षण करणें ( अवनि ).
अश् खाणें, व्यापणें.
अक्ष् व्यापणें.

### आ

आछ् विस्तार करणें.
आस् बसणें.

### इ

इ जाणें.
इ ( अधि ) पढणें (अध्ययन).
इग् जाणें.
इन्द् ऐश्वर्ययुक्त होणें (इन्द्र).
इन्ध् पेटविणें ( इन्धन ).
इष् इच्छिणें ( इच्छा ).

### ई

ई जाणें.
ईड् स्तुति करणें.
ईर् जाणें ( प्रेरणा ).
ईर्ष्य् हेवा करणें ( ईर्ष्या ).
ईश् नियमन करणें (ईश्वर ).
ईह् उद्योग करणें.

### उ

उख् जाणें.
उच् जमविणें.
उंछ् वेचणें.
उझ्झ् सोडणें.
उन्द् भिजविणें.
ऊर्णु आच्छादन करणें.
ऊह् तर्क करणें.

### ऋ

ऋ जाणें.
ऋच्छ् जाणें.
ऋण् जाणें.
ऋज् जाणें.
ऋत् निंदा करणें.
ऋध् वाढणें.
ऋष् जाणें.

### ए

एज् चमकणें, कांपणें.
एध् वाढणें.

ओ

ओख् शोपणें.

क

कख् हसणें.
कण् डोळे मिटणें.
कत्थ् स्तुति करणें.
कम् इच्छिणें ( काम ).
कर्ज् पीडा देणें.
कल्ह् अस्पष्ट शब्द करणें.
कस् हालणें.
कास् खोकणें.
किट् त्रास देणें.
कित् राहणें, रोग बरा करणें. ( चिकित्सा ).
कीट् रंगविणें.
कु शब्द करणें.
कुट् वांकडा होणें.
कुह् आश्चर्य वाटणें.
कुत्स् दोप देणें.
कुष् पिळणें.
कुस् जोडणें.
कृप् कल्पना करणें.
कृत् शब्द करणें, प्रसिद्ध करणें.
क्नूय् वाजणें, ओलें होणें.
क्रंद् ओरडणें, शोक करणें.
क्रीड् खेळणें ( क्रीडा ).
क्रुध् रागावणें ( क्रोध ).
क्रुश् ओरडणें ( आक्रोश ).
क्लम् ग्लान होणें.
क्लिद् ओलें होणें.
क्लिश् दुःख होणें ( क्लेश ).
क्वण् वाजणें.

ख

खद् मारणें, खाणें.
खेल् हालणें.

ग

गद् बोलणें ( गद्य ).
गर्व् डौल मारणें.
गर्ह् निन्दा करणें.
गाध् राहणें.
गाह् शिरणें.
गुज् अस्पष्ट शब्द करणें.
गुर् उद्योग करणें.
गॄ गिळणें.
गेष् शोधणें.
ग्लुच् चोरणें.
ग्लै ग्लान होणें.

घ

घट्ट् हालविणें.
घस् खाणें.
घृ गळणें ( घृत ).
घृण् प्रकाशणें.

च

चंच् जाणें.
चट् फुटणें.
चंड् रागावणें.

चण् वाजणें.
चप् जाणें.
चम् जाणें.
चर्च् संवाद करणें ( चर्चा ).
चाय् पूजिणें, समजणें.
चिक्क् पीडा देणें.
चित् जाणणें ( चित्त ).
चित्र् आश्चर्य वाटणें.
चिल् वस्त्र पांघरणें.
चिल्ल शिथिल होणें.
चीफ् घासणें, स्पर्श करणें.
चीव् बोलणें.
चेष्ट् चळवळ करणें.
च्यु जाणें.
च्युत् शिंपडणें.

छ

छर्द् ओकणें.
छुप् स्पर्श करणें.
छो कापणें.

ज

जट् गोळा करणें ( जटा. )
जड् गोळा करणें.
जल् पाजवणें, तीक्ष्ण करणें.
जष् हिंसा करणें.
जस् सोडणें.
जक्ष् खाणें.
जुष् सेवा करणें.
ज्या वृद्ध होणें.
ज्वर् रोग होणें.

ट

टिप् गळणें.

ड

डब् फेंकणें.
डुल् झोंकणें, फेंकणें,

ढ

ढौक् जाणें.

त

तग् जाणें.
तंच् आंखडणें.
तम् दुःख भोगणें.
तर्ज् निंदा करणें.
तर्द् मारणें.
तल् स्थापना करणें.
तस् शोभविणें, फेंकणें.
ताय् पसरणें.
तिज तीक्ष्ण करणें.
तिम् ओलें करणें.
तिल् जाणें.
तुण् वांकडें होणें.
तुद् पीडा देणें.
तुफ् मारणें.
तूर्य् पूर्ण करणें.
तृद् दुःख देणें.
तृह् मारणें.
तेव् क्रीडा करणें.
त्रप् लाजणें.
त्रै रक्षण करणें.
त्वच् आच्छादन करणें.

त्विष् प्रकाशणें.

द

दय् रक्षण करणें.
दरिद्रा वाईट स्थिति होणें.
दक्ष् वाढणें.
दिव् खेळणें, प्रकाशणें.
दिश् दाखविणें.
दिह् वाढविणें.
दी नष्ट होणें.
दीक्ष् यज्ञ करणें, नियम घेणें (दीक्षा, दीक्षित).
दु दुःख देणें.
दुष् वाईट होणें.
दृप् गर्व करणें ( दर्प ).
द्युत् प्रकाशणें.
द्रु पाझरणें ( द्रव ).
द्रुह् द्वेष करणें ( द्रोह ).
द्विष् द्वेष करणें ( द्वेष ).

ध

धा धारण करणें.
धिव् संतोष करणें.
धुक्ष् पेटविणें.
धू कापणें.
धूप् तापविणें.
धे पिणें.
ध्मा फुंकणें ( धमनी ).
ध्यै चिंतन करणें ( ध्यान ).
ध्वज् चालणें.
ध्वन् शब्द करणें.
ध्वंस् नाश पावणें.

न

नद् शब्द होणें ( नाद. )
नभ् नसणें.
नर्द् ओरडणें.
नह् बांधणें.
नाथ् मागणें, श्रीमान् असणें.
निज् धुणें, शुद्ध करणें.
नु स्तुति करणें.
नुद् प्रेरणा करणें.

प

पंड् जाणें, जाणणें.
पण् व्यवहार करणें, जाणें. पाणि ( हात ).
पिट् शब्द करणें.
पिश् जाणें.
पीव् पुष्ट होणें.
पुल् मोठें होणें.
पुड् चूर करणें.
पुर् पुढें जाणें.
पुष्प् फुलणें.
पु शुद्ध करणें.
पूर् पुष्ट होणें.
पृ उद्योग करणें.
पृच् स्पर्श करणें.
पृ पालन करणें.
प्याय् वाढणें.
पेल् हालणें.
पैण् जाणें.

प्रथ् प्रसिद्ध होणें.
प्रा भरणें.
प्री संतुष्ट करणें.
प्रु जाणें.
प्रुट् चोळणें.
प्लु जाणें.
प्लिह् जाणें.
प्लुष् जाळणें.
प्सा खाणें.

फ

फण् चालणें.

ब

बुड् टाकणें.
ब्रू बोलणें.

भ

भट् पोषण करणें.
भण् बोलणें.
भा प्रकाशणें.
भाम् रागावणें.
भेष् भिणें.
भ्रंश् पडणें.
भ्राज् प्रकाशणें.
भ्राश् प्रकाशणें.

म

मख् चालणें.
मंत्र् मसलत करणें.
मस् मोजणें.
मह् सन्मान देणें.
मी फेकणें.
मिह् शिंपडणें.
मील् झांकणें.
मुद् आनंदित होणें.
मुष् चोरणें.
मूर्च्छ् बेशुद्ध होणें.
मृग् शोध करणें.
मृज् शुद्ध करणें.
मृश् स्पर्श करणें.
मृष् सहन करणें.
मे अदलाबदल करणें.
मेव् सेवा करणें.
म्ना अभ्यास करणें.
म्रद् कुस्करणें.
म्रुच्, म्लुच् } जाणें.
म्लेच्छ् अशुद्ध —अस्पष्ट बोलणें.

य

यंत्र् संकोच करणें.
यम् नियमन करणें.
यस् यत्न करणें ( आयास ).
यु मिसळणें.

र

रख् जाणें.
रण् बोलणें.
रस् रुचि घेणें.
रा देणें.
रास् ओरडणें.
रु शब्द करणें.

रुज् रोग होणें ( रोग ).
रेक् शंका घेणें.
रोड् वेडा-उन्मत्त होणें.

ल

लष् बोलणें.
लष् इच्छिणें.
लस् खेळणें.
ला घेणें.
लिश् कमी करणें ( लेश ).
लिह् चाटणें ( लेह).
ली चिकटणें.
लुड् ढवळणें.
लुप् तोडणें.
लुभ् लोभ करणें.
लू तोडणें.
लोच् पहाणें ( लोचन ).
लोष्ट् सांचणें.

व

वंच् फसविणें ( वंचना ).
वर्च् प्रकाशणें.
वश् इच्छिणें.
विच् वेगळें करणें ( विवेक).
विज् भिणें.
वीर् पराक्रम करणें.
विष् व्यापणें.
वेल् हालणें.
वेप् कांपणें.
व्यच् फसविणें.
व्यथ् पीडा देणें ( व्यथा).
व्ये आच्छादन करणें
व्रज् जाणें.
व्रण् दुखविणें.
व्यय् खर्च करणें.
व्रश्च् कापणें.
व्रीड् लाजणें.

श

शठ् कपट करणें.
शद् नाश पावणें.
शव् जाणें.
शाख् व्यापणें.
शिघ् वास घेणें.
शिट् अनादर करणें.
शील् मनन करणें.
शुच् शोक करणें (शोक ).
शुठ् आळस करणें.
शुध् स्वच्छ करणें.
शूर् पराक्रम करणें.
शूल् पीडा होणें.
शॄ मारणें, क्षीण होणें.
शो धार लावणें.
श्चुत् पाघळणें.
श्यै हालणें.
श्रण् देणें.
श्रंभ् सैल करणें.
श्रंथ् विश्वास ठेवणें.
श्रा शिजविणें.
श्री शिजविणें.
श्लाघ् स्तुति करणें.

श्लिष् आलिंगिणें.
श्लोक् रचणें.
श्वि वाढणें, सुजणें.

स

सह् सोसणें.
सि बांधणें.
सिध् पूर्ण करणें.
स्त्यै एकत्र होणें.
स्नु पाझरणें.
स्मि हसणें.
स्वञ्ज् आलिंगिणें.
स्विद् घाम येणें (स्वेद.)
संज् संग करणें (संग).
सम् पसरणें.
सू प्रसवणें.
सूद् नासणें.
सृज् उत्पन्न करणें (सृष्टि).
स्कंद् जाणें.
सो संपणें.
स्निह् चिकटणें (स्नेह).
स्नुह् ओकणें.
स्पंद् हालणें.
स्पर्ध् दुसऱ्याच्या पराभवाची इच्छा करणें (स्पर्धा).
स्पृह् इच्छिणें (स्पृहा).
स्फुर्छ् पसरणें.
स्फूर्ज् गडगडाट होणें.
स्रंभ् विश्वास ठेवणें.
स्रंस् गळणें.
स्रु जाणें.
स्वन् शब्द करणें.
स्वप् निजणें (स्वप्न).
स्वृ शब्द करणें (स्वर).

ह

हद् हगणें.
हु होम करणें (होम).
ह्रस् कमी होणें (ऱ्हास).
हुर्छ् वांकडें होणें.
ह्नु लपविणें.
ह्री लाजणें.
ह्वृ वांकविणें.
ह्वे बोलावणें.

क्ष

क्षम् क्षमा करणें (क्षमा).
क्षिण् जखम करणें.
क्षुध् भूक लागणें (क्षुधा).
क्षै ऱ्हास होणें.
क्षी नाश पावणें.
क्षीव् उन्मत्त होणें.

## हेमचंद्राच्या देशीनाममालेंतील[1] व मृच्छकटिकादि नाटकांच्या बालभाषेंतील मराठींत येणारे शब्द.

अक्का ( भगिनी ).
अड=आड (कूप).
अग्घाड=आघाडा.
अप्पा=आपा(बाप).
अम्मा ( आई ).
उज्जाड (ओसाड).
उडीद.
उब्भाळण=उभळणें(पाखडणें).
उभा.
उंबरा.
उंबी=ओंबी.

उल्लुट=उलट.
उसअं=उसें.
उसण.
ओढणें.
ओहट्टो=ओटा.
किलञ्च.
कुल्हो=कोल्हा.
कोड्ड=कोड (आश्चर्य).
कोट्टिंबो=कोठिंबा.
कोलित्त=कोलित.
खडुकी=खिडकी.

खम्मखम (मनोदुःख)=खुमखुम.
खरडीअ (मोडलेलें) खरडणें.
खळ ( चिकट पदार्थ ).
खुंटा—टी.
गड्डी=गाडी.
गड्डीरी=गंडेरी.
गढ=गड.
गत्ताडी=गाताडी.
गवत.

१. या देशी शब्दांविषयीं पुष्कळ मतभेद आहेत. जे कित्येक एका कोशकारानें देशी ह्मटले आहेत त्यांस दुसरा तद्भव ह्मणतो, त्यानें तद्भव ह्मटलेल्यांस तिसरा देशी ह्मणतो. आमच्या प्राचीन सर्व प्राकृत ग्रन्थकारांचें असें मत आहे कीं, सर्व एतद्देशीय प्राकृत भाषा साक्षात् किंवा परंपरेनें संस्कृत भाषेपासून निघाल्या आहेत. ज्या शब्दांची व्युत्पत्ति कळत नाहीं त्यांस ते देशी शब्द असें ह्मणतात. यामुळें कित्येक ग्रंथकारांच्या ध्यानांत कित्येक तद्भव शब्दांची व्युत्पत्ति न आल्यामुळें त्यांस त्यांनीं देशी ह्मटलें. अलीकडील कित्येक पाश्चात्य पंडितांनीं इकडील प्राकृत भाषांचा अभ्यास केला आहे. त्यांपैकीं कित्येकांस एतद्देशीय सर्व भाषा संस्कृतोत्पन्न आहेत हें मत मान्य नाहीं. त्यांचें ह्मणणें असें कीं, संस्कृत भाषा बोलणारे आर्यलोक बाहेरून भरतखंडांत आले. त्यापूर्वी येथें राहणारे मूळचे अज्ञानी लोक होते, त्यांच्या भाषेंतील कांहीं शब्द संस्कृतांत शिरले ते देशी शब्द होत. कित्येकांचें असें मत आहे कीं, हेमचंद्रादिकांनीं जरी पुष्कळ देशी शब्द दिले आहेत तरी त्यांत पुष्कळ फेरफार झाल्यामुळें त्यांस ते देशी असें वाटलें. वस्तुतः सूक्ष्म दृष्टीनें विचार केला असतां परंपरेनें संस्कृतोत्पन्न नाहींत असे फारच थोडे शब्द सांपडतील.

गोवर–री.
गोहो=(पुरुष)घोव.
घारी=घार.
घुंघुरडा.
घुम–णें.
घुसळ–णें.
घोटणें ( पिणें ).
चंग=चांग, चांगलें.
चमकणें.
चिखल.
चिराचिरा ( जलधारा ).
चेडा ( मुलगा ).
चोज ( कौतुक ).
चोपटणें.
चोपडणें.
चुळचुळणें.
चुडा.
चुंबळ.
चूड.
छल्ली=साल.
छिण्ळण=शिनळ.
छेंडा=शेंडा.
छिंप्पिर[1]=छप्पर.
जरंडा[2] ( वृद्ध ).

जागा.
जोनळा.
ज्वारी.
झड ( पावसाची ).
झाकणें.
झाड.
झीण.
झुरणें.
झूट ( खोटें ).
झोडपणें.
झोंडा (मूर्ख) झोंड.
झोळी.
टारगा.
टुंठो=ठोंठा.
टोळ.
ठोकणें.
डकणें.
डल्ल (पिणें ) डल्ला.
डावा.
डाळी=ढाळी.
डुंगर=डोंगर.
डुंबडोंब (चांडाळ).
डोळा.
ढांकणी.
ढेंकूण.

तंग.
तट्टी.
तडफड.
तडमड.
तरवड.
थकणें.
थक–णें.
थरथरणें.
थरूं.
थवा.
थेंब.
दोर–रा.
धण–न(विपुलता).
धाडणें.
धारें.
नथ.
निवळणें.
पट्टी=पाटी.
पडथळा (सारखा).
पडवी.
पयरवी.
पाडशी.
पिल्लूं.
पुस–ण.
पोट.

---

१. धान्याचें कणीस काढून घेतल्यावर खालीं बुडखा राहातो त्यास छिप्पिर असें नांव हेमचंद्राच्या देशी नाममालेंत सांगितलें आहे. त्याचा शाकारण्यास उपयोग करितात त्यावरून प्रचारांतील छप्पर शब्द झाला असावा. २. जरंड शब्द हेमचंद्रानें देशी शब्दांत दिला आहे तथापि तो जरठ शब्दाचाच अपभ्रंश असावा असें दिसतें.

पोत.
फस–णें.
फिटणें.
फुक्का (व्यर्थ)फुकट.
फोंफावणें.
बडबड.
बडा.
बाप.
बाहुली.
बुक्का–की.
बोकड.
बोंड.
बोड(तरुण)बोड्यो[1].
बोलणें.
भंभाळ ( वेडा ).
भांडण.
भालु.
मग ( नंतर ).
मठ्ठ.
मामा–मी.
मुंगुस.
मेहुणा–णी.
रवी.
रांजण.
राळा.
रीप.
रु.
रुंद.
रुवी.
रोट.
लकेरी.
लठ्ठ.
लांच.
लुंगा.
वणवा.
वांगें.
वाट.
वाण.
वायण=वाण.
वोझें=ओझें.
साजुक.
साई.
सुगी.
हरळी.
हाड.
हीर.

## आरबीशब्द.[2]

अकस ( अक्स= विरुद्ध ).
अकीक.
अक्कल.
अखत्यार.
अखबार.

१. कोंकणांत मुलास बोड्या ह्मणतात. २. हे शब्द मुसलमानांचें राज्य दक्षिणेंत झाल्यापासून मराठींत आले आहेत. यांत बहुतकरून राजकीय व्यवहाराचेच पुष्कळ शब्द आहेत. आरबस्थानांतील लोकांची जी भाषा ती आरबी होय. हींतच मुसलमानी धर्माचा आद्यप्रवर्तक जो महमद त्यानें त्या धर्मांचा कुराणनामक आद्यग्रन्थ लिहिला आहे. फारसी भाषा ही आरबीपेक्षां अर्वाचीन आहे. हल्लीं ज्यास इराण ह्मणतात तेथील लोकांस पूर्वी पारसी किंवा पारसीक असें ह्मणत असत. यांची जी प्राचीन भाषा तिला झेन्द असें ह्मणतात. हिचें संस्कृत भाषेशीं पुष्कळ साम्य आहे. कोणी संस्कृत भाषेपासून झेन्द भाषा निघाली असें ह्मणतात व कोणी संस्कृत व झेन्द या पूर्वीच्या एका भाषेच्या शाखा आहेत असें ह्मणतात. हेंच

| | | |
|---|---|---|
| अजब. | अजम ( मोठा ). | अतलस. |
| अजबाब. | अजमत(मोठेपणा). | अत्तर. |

हल्लींच्या फारसी भाषेंतील कित्येक शब्दांचें कित्येक संस्कृत किंवा मराठी शब्दांशीं साम्य असण्याचें कारण होय. शोधक वाचकांच्या माहितीकरितां पुस्तकाच्या शेवटीं, संस्कृत, झेन्द, आणि फारसी या भाषांतील कित्येक सारख्या शब्दांचें कोष्टक दिलें आहे. [1] या झेन्द भाषेपासून पेल्हवी व इराणी किंवा फारसी या भाषा निघाल्या. पुढें मुसलमान लोकांनीं इराण देश जिंकिला तेव्हां तेथील लोकांचा मूळधर्म बुडवून आपला धर्म सुरू केला तेव्हां सर्व व्यवहार, रीतिभाति बदलून लोक मुसलमान झाले. तेव्हां मुसलमानांची जी आरबी भाषा तींतील शब्दही इराणीभाषेंत शिरूं लागले. या मिश्रणापासून हल्लींची फारसी भाषा झाली आहे. हें मिश्रण इतकें पूर्ण झालें आहे कीं, अमुक शब्द फारसी व अमुक आरबी हें ठरविण्यास मोठी अडचण पडते. कित्येक संयुक्त शब्द आहेत त्यांचा एक अवयव फारसी व दुसरा आरबी असा असतो, यामुळें पुढें ज्या यादी दिल्या आहेत त्यांत आरबींत कित्येक फारसी शब्द व फारसींत आरबी शब्द येण्याचा संभव आहे. परंतु त्यांविषयीं करवला तितका शोध करून यादी दिल्या आहेत. वर जी झेन्द भाषा सांगितली तीच मुंबईतील पारशी लोकांची पवित्र भाषा. तींत लिहिलेला जो आवेस्तानामक ग्रन्थ तो त्यांचा आद्यधर्मग्रन्थ. हा झरदुष्टनामक धर्मप्रवर्तकानें लिहिला. इराण देश जिंकून मुसलमानांनीं आपला धर्म तेथें चालू केला. बहुतेक इराणी लोक मुसलमान झाले, परंतु कांहीं थोडे इतके धार्मिक होते कीं, देशत्याग करावा लागला तरी हरकत नाहीं परंतु स्वधर्मत्याग करावयाचा नाहीं, असा त्यांनीं निश्चय केला. धर्मभ्रष्ट झाल्याशिवाय देशांत राहणें होत नाहीं असें झालें तेव्हां हे लोक हिंदुस्थानांत गुजराथेकडे पहिल्यानें आले. कांहीं करार करून तिकडील हिंदु राजांनीं त्यांस देशांत राहण्यास परवानगी दिली. तेव्हांपासून बायकांनीं कुंकू लावणें, बांगड्या भरणें वगैरे हिंदूंच्या चाली यांच्यांत पडल्या होत्या. हल्लीं इंग्लिश लोकांचें प्राबल्य झाल्यामुळें हे लोक त्यांचें अनुकरण करतात. यांस स्वदेश सुटल्यापासून स्वभाषाही सुटली. गुजराथेंत राहून तेथील लोकांशीं व्यवहार सुरू झाल्यामुळें गुजराथी भाषाच यांची भाषा झाली. हल्लीं शाळांतून फारसी भाषेचा अभ्यास बराच

1. पुरवणी २ पहा.

| | | |
|---|---|---|
| अद्ब–बी. | अयब ( उणीव ). | अस्सल. |
| अदालत. | अरब. | असील. |
| अदावत. | अरबैन ( ४० ). | असामी. |
| अद्दल ( न्याय ). | अर्ज–अर्जी. | आदमी. |
| अनामत. | अलगर्जी. | आफत. |
| अनार. | अलबत. | आशक. |
| अनीन. | अलम. | इकरार. |
| अफवा. | अलवान ( रंग ). | इजत. |
| अवलक. | अलाई. | इजा. |
| अंबारी. | अलाद. | इजार. |
| अबाशाई. | अलाहिदा. | इजाफत. |
| अमल. | अवल ( पहिला ). | इतबार. |
| अमलदस्तूर. | अवलाद (औलाद). | इतमाम. |
| अमीन–नी. | अवलिया. | इतराजी. |
| अमीर. | अशर. | इतलाख. |

वाढल्यामुळें पारशी लोकांनीं गुजराथी भाषेंत फारसी शब्दांची बरीच भेसळ केली आहे. यामुळें नागर वगैरे हिंदु लोकांची गुजराथी भाषा व पारशी लोकांची गुजराथी भाषा यांत दिवसेंदिवस अधिक फेर होत जाईल. पारशी लोकांच्या स्वभाषेचा लोप, व अलीकडील विद्याधनसंपन्न युरोपांतील इंग्लिश, फ्रेंच, वगैरे लोकांच्या भाषांचा अत्युत्कर्ष, यावरून भाषेच्या संबंधानें एक ठळक गोष्ट दिसून येते ती ही कीं, स्वराज्य आणि स्वभाषा यांचा निकट संबंध आहे. स्वराज्याची अभिवृद्धि होऊन देश संपन्न झाला ह्मणजे बुद्धिमान मनुष्यांचा निर्वाह शरीरश्रम न करतां होऊं लागतो. असें झालें ह्मणजे मानसिक श्रमांकडे त्यांचें चित्त लागून अनेक कला उत्पन्न होतात; त्याप्रमाणेंच ग्रन्थसमूह वाढत जाऊन भाषेचा उत्कर्ष होतो. प्राचीनकाळीं संस्कृत, ग्रीक, लातिन इत्यादि भाषांचा उत्कर्ष होण्याचें हेंच कारण होय. देशाचा उत्कर्ष आणि भाषेची निकृष्ट स्थिति किंवा देशाची निकृष्ट स्थिति आणि भाषेचा उत्कर्ष असें उदाहरण पृथ्वीच्या पाठीवर सांपडणें कठिण.

इतल्ला.
इनसाफ.[1]
इनाम.
इब्रत—इभ्रत.
इमला.
इमान.
इमारत.
इरसाल.
इरादा.
इलम.
इलाखा.
इलाज.
इशारत.
इशारा.
इष्क, इषक (प्रेम).
इसम.
इस्तकबील तागाईत.
ईद.
उजूर.
उमदा.
उमर.
उमराव.
उरूस ( लग्न ).
ऊर्फ.
ऐन.
ऐपत ( साधन ).

ऐवज.
ऐवजीं.
ऐषआराम.
औरत.
औजार.
कज्जा.
कतबा.
कतार ( ओळ ).
कत्तल.
कदम.
कदर.
कदीम.
कंदील.
कनात.
कपात.
कपार.
कफण.
कबजी.
रुबर.
कबीर ( मोठा ).
कबुलात—लायत.
कबूल.
कमाल.
कयास.
करामत.
करणा.
करार.

कर्ज.
कर्याद.
कलम—मी.
कलाल.
कवाईत.
कवाल.
कसब.
कसबा.
कसर ( अंश ).
कसरत.
कसाई.
कसाब.
कहर.
काईम.
काईल.
काजी.
कानू.
काफर—री.
काफला.
काबीज.
काबील.
काबू.
कायदा.
कितान.
किताब.
कित्ता.
किमत.

१. आरबी भाषेंत निस्फ शब्दाचा अर्थ अर्धे असा आहे त्यावरून इनसाफ शब्द झाला आहे. त्याचा अर्थ दोन समान भाग करणें असा आहे. यावरून न्याय असा अर्थ झाला.

किमया.
किल्ला.
कुफराण.
कुराण.
कुरापत.
कुलाबा.
कुवत.
कैद.
कैली.
कोस.
कौल.
खत ( पत्र ).
खंदक.
खबर.
खबरदार.
खराब.
खरीप—फ.
खलाशी.
खलास.
खवीस.
खातर.
खाशी.
खास.
खासा.
खाल्सा.
खिजमत.
खिलात.
खिसा.
खिस्त.
खुमारी.
खुमास.
खुरशी.
खुलास—सा.
खेरीज.
खैरात.
ख्याल.
गजब.
गजल.
गफलत.
गम ( दम ).
गलबत.
गरक—गर्क.
गरज.
गरीब.
गलतान.
गलिच्छ.
गलीम.
गाजी.
गाशा.
गुराब.
गुलाम.
गैबी.
गैर.
गोता.
घुस्सा.
चरबी.
जकात.
जप्त.
जबर.
जबाब.
जमा.
जमात.
जरूर.
जलाल.
जवजे.
जवार.
जवाहीर.
जाफा.
जाबता.
जामीन.
जाहीर.
जारी.
जालीम.
जासूद ( हेर ).
जिकीर.
जिंद.
जिम्मा.
जिराईत.
जिलीब.
जिल्हई.
जिल्हा.
जुजबी.
जुरत.
जुलूम.
तकलादी.
तकलुबी.
तकवा.
तकशीम—सम.
तकशीर—सीर.
तकूब.

तकरार.
तगदमा.
तगाई.
तगादा.
तजवीज.
तजावजा.
तजेला.
तणाव–वा.
तपशील–सील.
तपास–तपासणी.
तफावत.
तबक.
तबलक.
तबियत.
तबीब.
तंबूरा.
तबेला.
तमा.
तमाम.
तरजुमा.
तरफ.
तरबेज.
तरतुद.
तऱ्हा.
तलफ.
तलब.
तवकल.
तंवर.
तसदी.
तसनस.

तसबीर.
तसलमात.
तहशील–सील.
ताईत.
ताकत–द.
ताजीम.
ताफा.
ताबी.
ताबूद.
तारीख.
तारीफ.
तालीम.
तालुका.
ताशा.
तास.
तुती.
तुफान.
तुरा.
तैनात.
तैष.
तोरा.
तोबा.
तोशीस.
तोहमत.
दगलबाज.
दपतर,दफतर.
दबदबा.
दमदमा.
दरक.
दर्जा.

दलाल.
दवा.
दस्तुर.
दाखल.
दावा.
दिक्क.
दिमाख.
दिम्मत.
दीन.
दुनया.
दुवा.
दौत.
दौलत.
नकशा.
नक्कल.
नकशी.
नकाशा.
नकी–क्की.
नगद–नक्त (रोख).
नगद–दी.
नगारा.
नजर.
नजराणा.
नफर.
नफा.
नशियत.
नबाब.
नशीब, नसीब.
नहर.
नाजर.

नायब.
नाल.
नासूर.
निका.
निखालस.
निसबत.
निहाय.
नुकसान.
नुक्ता.
नूर.
नौबत.
फकीर—फुकरा.
फक्त.
फजर.
फजिती.
फडणवीस.
फत्ते.
फन्ना.
फरक.
फरज्.
फर्द.
फलाणा.
फवारा.
फरारी.
फरास.
फरीद.
फसल.
फाजील.
फाम.
फायदा.

फारखत.
फिकीर.
फिदा.
फिसाद.
फुरजा.
फुरसत.
फेरिस्त.
फैल.
फैसल.
फैसला.
फौज.
बकाल.
बखा.
बजाज.
बदल.
बदला.
बयाद.
बयाणा—ना.
बरकत.
बलाय.
बाकी.
बातल.
बाब.
बिछाईत.
बितीम.
बिदा.
बिदागी.
बिन (रामा बिन कृष्णा).
बिलकूल.

बुरखा.
बुलाख.
बेलाशक.
बेहतन.
बैत.
मकाण.
मक्ता.
मखमल.
मगदूर.
मजकूर.
मजबूत.
मजमु.
मजुरा.
मजल.
मजलस.
मजा.
मजाल.
मजालस.
मंजूर.
मजुरा.
मतलब.
मत्ता.
मदत.
मदार.
मनसब.
मनसुबा.
मना.
मनाई.
मनुका.
मनोरा.

मयत.
मरशा.
मरातब.
मरामत.
मर्जी.
मल्हर—मल्हल.
मवाशी.
मशागत.
मशारनिल्हे—निल्हे.
मशाल.
मसीद.
मश्रु.
मसकती[1].
मसनद.
मसलत.
मसाला.
मसुदा.
मस्करी.
महकूब.
महजर.
महला—ल्हा.
महशूर.
महसूल.
महामुदी.
महामूर.
महाल.
माजी.
माजूम.
मातबर, मातब्बर.
माना.
माफ.
माफक.
माफी.
माम्ला.
मामलत.
मामला.
मामूल.
मायना.
मारफत.
माल.
मालक.
मालीम.
मालूम.
माशुक.
मासला.
मिनत.
मिना.
मिरास.
मिळखत.
मिलाफ.
मिसळ.
मुकदम.
मुकर.
मुकदमा, मुकद्दमा.
मुकावली.
मुकाम.
मुखत्यार.
मुजरत.
मुजाखा.
मुजाफत.
मुत्सद्दी.
मुतालीक.
मुदत, मुद्दत.
मुद्दा.
मुद्दाम.
मुनसफ.
मुनीम.
मुबलक.
मुबा, मुभा.
मुबारक.
मुरंबा.
मुरव्बी.
मुरवत.
मुराद.
मुलाईम.
मुलाखत.
मुलाजा.
मुलामा.
मुलुक—ख.
मुल्ला.
मुशकील.
मुसकील.
मुशाफर.
मुशार—रा.
मुशाहिरा.
मुसलमान.
मुस्तकीम.

---

1. मस्कतशहरचा.

मुस्तेद.
मेहनत.
मेहरप—ब—राब.
मोकासा.
मोघम.
मोजदात—द.
मोताद.
मोबत.
मोबदला.
मोमीन.
मोर्तब.
मोसबा.
मोसम.
मोहबत—द.
मोहरम.
मोहिम.
मौज.
मौजा.
मौजे.
मौलवी.
याकूत.
येसान.
रकबा.
रकम.
रजब.
रजा.
रतीब.
रतल, रत्तल.
रदबदली.
रद्द.

रफूत.
रफा.
रबिलाखर.
रबी—रब्बी.
रमजान.
रमल.
रमूज.
रयत.
रयात.
रसूम.
राजी.
राबता.
रायात.
रिक्बी.
रिजाला.
रिवाज.
रिसाला.
रुखसत.
रुजामा.
रुजु-बात.
रेलणें.
रोखा.
लकब.
लजत.
लवाजमा.
लवाद.
लहज.
लाजीम.
लायक.
लिभास.

लिव्हास.
लुक्का.
वकर.
वकल.
वकील.
वकूब.
वक्त.
वजन.
वजा.
वजीर.
वतन.
वर्ख.
वर्म.
वल्द.
वशीला.
वसवसा.
वसूल.
वहमा.
वहीम.
वाकब.
वाका—खा.
वाजवी.
वायदा.
वारस.
वारसा.
वारीद.
वारीस.
वाली.
वाशील.
वासलात—द.

विजायली.
विराखत.
विल्हा.
विल्हे.
शकल ( युक्ती ).
शरा.
शर्थ.
शलक.
शर्यत.
शहामत.
शान.
शाबान.
शाबीत.
शाबूत—द.
शाहीर.
शिकल.
शिक्का.
शिद्दी.
शिलक.
शुरवात.
शुरू.
शेरा.
शौक—ख.
सई.
सक्त—ख्त.
सजल.
सदर.
सदरहू.
संदूक.
सद्दी.

सन.
सनद.
सफ.
सफर.
सफाई.
सबब.
सबर.
सबा.
सबुर.
संमत.
समला.
समान.
सय्यद.
सरकत.
सराइत.
सराफ.
सरिका.
सर्वत.
समल.
सला.
सलावत.
सलाम.
सलामत.
सलीस.
सलूक—ख.
सल्ला.
सल्लास.
सवाल.
सहल.
सही.

सादिल्वार.
साफ.
साफी.
साबान.
साबीक.
साबीत.
सामलात.
सामील.
सायर.
सालस.
साहेब.
सुकाण.
सुंता.
सुदानत.
सुनी.
सुभा.
सुरत.
सुरवात—सुरुवात.
सुरसन.
सुरू.
सुलुख.
सुलतान.
सैतान.
सैर.
सोबत.
सोमल.
सोहोलत.
हकिकत.
हकीम.
हक्क.

हजर.
हजरत.
हजाम.
हजामत.
हजीर.
हद्द.
हबशी.
हमाम.
हमाल.
हमी.
हय्यकोल.
हयवान.
हयात.
हरकत.
हरदम.
हरफ.
हराम.
हरीप—फ.
हलक—हल्लक.
हलवा.
हलाकी—खी.
हलाल.

हल्ला.
हल्लीं.
हवलदील.
हवा.
हवाल.
हवाला.
हवेली.
हव्यास.
हशम.
हशा.
हसबी.
हांशील.
हाय.
हाल.
हालमस्त.
हालीमाजी.
हांव.
हिकमत.
हिकायत.
हिजरी.
हिम्मत.
हिमायत.

हिरस.
हिलाल.
हिल्ला.
हिशेब.
हिसा.
हुकुम.
हुक्का.
हुजत.
हुजरात.
हुजूर.
हुद्दा.
हुबेहूब.
हुरमत.
हुरमूज.
हुरूम.
हैबत.
हैराण.
हैवान.
हौद.
हौदा.
हौस.

## फारसी शब्द.

अखर, अखेर.
अगन, नगन.
अगर.
अंगूर.
अजमास.
अजरतरफ.

अजाल.
अजुर्दा.
अतसबाजी.
अंदरखुशा.
अंदाज.
अंदेशा.

अनार.
अपसंत.
अपकारा.
अफू.
अबदागीर.
अबदार.

अमदानी.
अंबार.
अब्रू.
अमनचैन.
अयनक.
अयना.
अयरान.
अयाल–ळ.
अरकस.
अराबा.
अराब–स.
अलबत–त्ता.
अलगूज.
अलमगीर.[1]
अलावा.
अलुबुखर.
अवजार.
अस्तनी.
अस्मान ( वर्तुलाकार ).
अस्वार.
आजार.
आबाद–दी-दानी.
आमेज.
आयना ( आरसा ).
आराज.
आलिजहां.

आवाज–दारी.
इजार–दार.
इजारा.
इरादा.
इलायची.
उमेद.
उरुबुरू ( समोरा-समोर ).
उस्त्रवारी.
कंगोरा.
कपापचिनी.
कंपेश.
कम.
कमर.
कलमदान.[2]
कमान.
कशीदा.
कागद.
कारकीर्द.
कारकून ( काम करणारा ).
कारखाना.
कारवान.
कारभार.
कारागीर.
किनखाप.
किनारा–री.

किफायत.
कीर्द.
कुजा.
कुमक.
कुस्ती.
कूच.
कैफ.
कोतवाल.
कोता.
कोळंजन.
खजीना.
खंजीर–री.
खजील.
खणाजंगी.
खंदा.
खबूतर.
खराबी.
खरीद.
खरेदी.
खर्च.
खलबत.
खलीता.
खसखस.
खाक.
खाना.
खावंद–विंद.

---

१. जगांत मोठा. २. ठेवण्याचें पात्र या अर्थी दान प्रत्यय लागतो उ० कलमदान.

खिजमत-दमत (चाकरी).
खिरापत.
खिसा.
खिसमीस.
खुद–द्द.
खुदा.
खुन–नी.
खुबी.
खुराक–ख.
खुर्द.
खुर्दा.
खुश.
खुशकी.
खुशामत.
खुशी.
खून.
खूब (सुंदर).
खेचर.
खैर.
खैरात.
खोगीर.
खोजा.
गज.
गंज.
गंजीफ.
गमजा.
गरद–गर्द.

गरदन.
गर्दा.
गर्दि.
गरम (गरमा).
गरमी.
गल्ला.
गस्त (फेरी).
गालीचा.
गिर्दी.
गिलावा,
गिल्ला.
गुंग.
गुजर.
गुजराण.
गुदस्त.
गुन्हा.
गुन्हेगार[1].
गुमान.
गुमास्ता.
गुल (फूल.)
गुलकंद.
गुलजार.
गुलबास.
गुलाब.
गूल.
गोलंदाज.
गोषवारा.
ग्वाही.

चंग.
चपराशी.
चमन.
चरक.
चरबी.
चलाख.
चश्मा.
चाकर.
चादर.
चाबूक.
चिराग.
चीग.
चीण.
चेहरा.
चोब.
छबिना.
जखम.
जंग.
जंगी.
जंजीर–रा.
जनान–नी.
जनावर.
जबानी.
जमीन.
जर (पागोटें वगैरेचा)
जरब.
जर्दा.

1. तें करणारा ह्या अर्थी गार हा प्रत्यय नामास लागतो.

जलद्–दी.
जवान.
जहर.
जहाज.
जागा.
जाजम.
जादा.
जादू.
जाबसाल.
जामदार.
जामा.
जाहागीर.
जाहाबाज.
जिंदगी.
जिन्नस.
जीन.
जुदा.
जुलाब.
जेर.
जेरबंद.
जोर.
झुल्प.
तक्त.
तक्ता.
तक्या.
तंग.
तगारी.
तनखा.
तमाशा.
तयार.
तरकारी.
तराजू.
तरबूज.
तराण–णा.
तलख.
तलास.
तवाना.
तस्त.
तह.
तहाहयात.
तक्षीम.
ताकीत–द.
तागाईत.
ताज.
ताजा.
तापता–फता.
तार.
तालेवार.
तावदान.
तिरंदाज.
तुमान.
तेजाब.
तेजी.
तंग.
तेगा.
तोसदान.
दगदग.
दगा.
दंग.
दफेदार.
दम–मा.
दमान.
दमामा.
दरकार.
दरखास्त.
दरगा.
दरजी.
दरद–दी.
दरबार.
दरम्यान.
दरया.
दरयाफत–ती.
दरवाजा.
दरवेशी.
दरोगा.
दरोबस्त.
दर्या.
दर्यास.
दस्त.
दस्ता.
दस्तुरी.
दहशत.
दाणा ( शहाणा )
दाद.
दार.
दारू.
दाल.
दालन.
दास्तान.
दिक्कत.

दिगर.
दिरंग–दिरींग.
दिल.
दिवाण.
दिवाल.
दुकान.
दुमची.
दुमाला.
दुय्यम.
दुरुस्त.
दुर्बीण.
दुश्मन.
दुशाला.
दूम.
दोस्त.
नखरा.
नजी–ख.
नजराणा.
नमाज.
नमुना.
नमूद.
नरद.
नरम.
नाखवा.
नाखुदा.
नाखुश्.
नाजूक.
नातवान.
नादान.
नाबद.

नाबूद.
नामदार.
नामोश.
नालस्ती.
निगा.
निमक.
निमचा.
निम्मा–म्में
निरख.
निशाण–णी.
नेक.
नेचा.
नेफा.
नोक.
नोकर.
न्याहारी.
न्याहाल.
पंजा.
पंजाबी.
पडदा.
पन्हा.
पन्हेरी.
पर ( पंख. )
परगणा.
परवा–पर्वा.
परवाणगी–नगी.
परवाना.
परागंदा.
परी.
पलख.

पलिता.
पलिस्त-पसंत.
पाजी.
पादशहा.
पायखाना.
पायमल्ली.
पारस.
पासंग.
पिलखाणा–ना.
पिस्ता
पिस्वाद.
पुरजा.
पुरशीस.
पुस्त.
पुस्ती.
पूल.
पेगम.
पेच–पेंच.
पेश–जी.
पेशबा.
पेशा.
पेषकवाज–वाज.
पेस्तर.
पेहरण.
पेहलवान.
पैगंबर.
पैजार.
पैदा.
पैदास्त.
पैमाश–ष

पैरव.
पैलु.
पैवस्ती.
पोक्त–क्ता.
पोतें.
पोशाख.
पोशिंदा.
पोलाद.
प्यादा.
प्याला.
फरमास.
फरोक्त.
फर्मान–ज.
फलानबिस्तान.
फस्त.
फानस–णस.
फिरंगी.
फिर्याद.
फिरस्ता.
बक्षी.
बक्षीस.
बखत.
बगर.
बगल.
बगीचा.
बंड.
बंद.
बंदर.
बदलाम.
बंदा.

बदाम.
बंदि.
बंदिस्त.
बंदोबस्त.
बयाणा.
बरकंदाज.
बरकशी–कस.
बरखास–खास्त.
बरतरफ.
बरदास्त.
बराबर.
बर्फ.
बर्फी.
बरात.
बलामत.
बस.
बस्तन.
बस्ता.
बहर.
बहाणा.
बहादर–दूर.
बहार.
बहाल.
बाग–बगीचा.
बागाईत.
बाजत.
बाजार.
बाजू.
बाद.
बादशाह.

बाबत–द.
बार.
बारकस–बार्कस.
बारकाई.
बारगीर.
बारदान.
बारदार.
बारनिशी.
बारीक.
बावर.
बिगर.
बिचारा.
बिनाखी.
बिनी.
बिब्बी.
बिमार.
बिलंद.
बिलोर.
बुणगे.
बुद्रुख.
बुरूज.
बेकार.
बेत.
बेलदार.
बेश.
बेशमी.
बोगदा.
बोई–य.
बोऱ्या.
भिस्ती.

मखमल.
मखलाशी—सी.
मगज.
मगजी.
मगरूर.
मजा.
मजूर—री.
मदत ( सहाय. )
मर्द.
मर्दानि.
मर्दुनि.
मर्फा.
मलम.
मलिदा.
मसक.
मस्का.
मस्त.
मस्तवाल.
मस्ती.
महिना.
मात.
मांदगी.
मादखान.
मांदा.
मादी.
माहित.
माहे.
मिजाज—द.

मिरवणें.
मीर.
मुजरत—द
मुजामा.
मुडदा.
मुनशी.
मुफत.
मुरीद.
मेख.
मेज.
मेजवानी—वानी.
मेणा.
मेंदगी.
मेवा.
मेहेर ( प्रीति ).
मेहरबानी[1]—नी.
मेहमान.
मैदा.
मैदान.
मोजा.
मोरचा.
मोरचंग.
मोहबत.
मोहर—रा.
म्यान.
म्याना.
याद.
याबू.

रकाना.
रग.
रजई.
रंजीस.
रफू.
रबक.
रवानगी.
रवाना.
रसद.
रस्ता.
रहदारी.
रास.
रास्त.
रुपुस्त.
रुमाल.
रुस्तुम.
रेजगी.
रेजा.
रेवस.
रेशीम.
रोगण.
रोज ( दिवस ).
रोजमरा—मुरा.
रोजा.
रोशनाई.
लंगर.
लगाम.
लब.

---

१. तें ज्यास आहे या अर्थी वान प्रत्यय लागतो.

लश्कर–लष्कर.
लाचार.
लाल.
लिफाप.
लुंगी.
लेजीम.
वगैरे.
वरावर्द.
वस्तरा.
वस्ताद.
वांकनीस.
वाह्वा.
शरबत.
शरम.
शरमिंदा–धी.
शह.
शहर.
शाई.
शागिर्द.
शादी.
शानदार.
शानिशा.
शाबास.
शामदान.
शायदी.
शाल.
शाहा.
शिकस्त.
शिकार.
शिताब.

शिपाई.
शिफारस.
शिबंदी.
शिर.
शिरका.
शिरताज.
शिरपाव.
शिरपेच.
शिरस्ता.
शिरा.
शिराणी.
शिलेदार.
शिशी.
शिवाय.
शिसा.
शिस्त–वार.
शेख–दार.
शेखी.
शेत–खाना.
शेर.
शेरणी.
सक्त–क्ती.
संगमरवर.
संगीन.
सजा.
संजाब.
सतम.
सतरंजी.
सतार.
संदान.

सनई.
सफेत–ता.
सबजा.
समशेर
सर.
सरकार.
सरजा.
सरजोर.
सरंजाम.
सरदार.
सरदा–री.
सरबरा.
सरसाला.
सरहद्द.
सराई.
सरासरी.
सरिफेवार.
सर्पोस.
सर्फराजी.
सवदा–गर–गीर.
सवार.
सवारी.
साज.
साजिंदा.
सांधा.
सामान.
सायवान..
सारवान.
सालिना.
सुमार.

सुरखाई.
सुरत.
सुरमा.
सुलाख.
सुस्त–स्ती.
सौदा.
सौदागर.
हंगाम.

हजार.
हजारी.
हत्ता.
हमेश–शा.
हंमेश–हंमेशा.
हरकारा.
हवई.
हाजारा.

हाजरी.
हिंदु.
हिसेरशी.
हुनर–न्नर.
हुम्मा.
हुशार–री.
होष.

## पुरवणी पहिली.

जिज्ञासा ( जाणण्याची इच्छा ) हा गुण परमेश्वरानें मनुष्याच्या अंगीं ठेविला आहे. याच्या योगानें जगांत अनेक मोठीं कार्यें उत्पन्न होतात. मोठमोठ्या उपयुक्त शास्त्रांचें आदिकारण जिज्ञासा होय. पदार्थांचे गुण कळल्यावर त्यांपासून जगास पुष्कळ उपयोग होतो; तथापि प्रथमतः तत्त्ववेत्त्यांचें लक्ष उपयोगाकडे नसतें. ते केवळ जिज्ञासेनेंच प्रवृत्त होतात. परमेश्वरानें सृष्टि उत्पन्न कशी केली याविषयीं प्राचीन काळापासून सुधारलेल्या सर्व देशांतील तत्त्ववेत्ते आपापल्या ज्ञानवृद्धीच्या मानानें विचार करून आपल्या समजुतीप्रमाणें सिद्धांत करीत आले. सर्वांच्या सिद्धांतांत थोडाबहुत फरक आहे; तथापि परमेश्वरानें सृष्टिकर्ता एक प्राणी उत्पन्न केला; यापासून हा सगळा विस्तार आहे, याविषयीं सर्वांचें एकमतच आहे. आलीकडे यूरोपांतील सुधारलेल्या देशांत जगाची पूर्वस्थिति जाणण्याविषयीं उत्कट इच्छा उत्पन्न झाली आहे. तीमुळें भूगर्भशास्त्र वगैरे अनेक विद्या उत्पन्न झाल्या आहेत. तिकडल्या विद्वान् लोकांत मनुष्याच्या उत्पत्तीविषयीं दोन पक्ष झाले आहेत. शरीरछेदन करून तदंतर्गत मांस, अस्थि, स्नायु, मज्जा इत्यादिकांची परीक्षा करितां या संबंधानें कित्येक मनुष्यजातींच्या शरीररचनेंत परस्परभेद दृष्टीस पडतो त्यामुळें एका पक्षाचें ह्मणणें असें आहे कीं, हल्लींचीं सर्व मनुष्यें एकाच जातीचा विस्तार नव्हे; एकाच काळीं किंवा भिन्न काळीं कांहीं थोड्या स्थळीं मनुष्यें फार प्राचीन काळीं उत्पन्न झालीं; त्यांचा पुढें विस्तार झाला, याकारणानें शरीररचनेंत भेद आहे. एकाचा सर्व विस्तार हें जें प्राचीन आद्यग्रन्थांचें ह्मणणें आहे तें त्या त्या देशाच्या संबंधानें मात्र खरें आहे. सर्व पृथ्वीच्या संबंधानें खरें नाहीं. दुसऱ्या पक्षाचें ह्मणणें असें आहे कीं,

सर्व पृथ्वींतील मनुष्यें एकाच मूळाचा विस्तार आहे; हेंच सयुक्तिक व संभवनीय दिसतें. कारण, शरीररचनेंत भेद फारच थोड्या ठिकाणीं आढळतो; व तोही मूळभेदामुळें नसून हवा, पाणी, भक्ष्य इत्यादिकांच्या भेदामुळें झालेला आहे.

वर मनुष्याच्या उत्पत्तीविषयीं जो जिज्ञासेचा प्रकार सांगितला तसाच भाषेच्या पूर्वस्थितीच्या जिज्ञासेचा आहे; तथापि हा सर्व देशांत सारखा नाहीं. प्राचीनकाळीं भरतखंडांतील ऋषींचें भाषाचमत्काराकडे फारच लक्ष लागलें होतें. व्याकरण, व्युत्पत्ति, या विषयांवरील त्यांचे ग्रन्थ पाहिले ह्मणजे मोठें आश्चर्य वाटतें. शब्दांचें पृथक्करण करून यांनीं असें ठरविलें कीं संस्कृत भाषेंतील सर्व शब्द क्रियावाचक धातूंपासून झाले. (सर्वं धातुजम्). यामुळेंच बहुतेक संस्कृत शब्दांची धात्वर्थमूलक उत्पत्ति सांगतां येते. हा जो शब्दांची धात्वर्थमूलक उत्पत्ति सांगण्याचा प्रकार त्यास "व्युत्पत्ति" (वि+उत्पत्ति) असें नांव पडलें. कालांतरानें कित्येक धातूंपासून उत्पन्न झालेलीं नामें मात्र भाषेंत राहून ते धातु नष्ट झाले त्यामुळें कित्येक शब्दांची व्युत्पत्ति सांगतां येईना. तेव्हां कांहीं शब्द अव्युत्पन्नही असतात असें मानून कांहीं पंडितांनीं व्युत्पन्न आणि अव्युत्पन्न असे शब्दांचे दोन विभाग केले. तथापि सर्वांचें मत असें आहे कीं, मनुष्यांचें आद्यस्थान भरतखंड होय; व आद्यभाषा संस्कृत होय. जे भरतखंडांतले आर्य लोक राज्यादिलोभानें दूर देशीं गेले ते आर्याचाररहित झाले, व विद्वान् आर्यांचा समागम नसल्यामुळें अशुद्ध बोलूं लागले, ते म्लेच्छ ह्मणजे अशुद्ध बोलणारे झाले, यामुळेंच पुष्कळ भाषांत पितृ,[1]

1. संस्कृत, झेन्द, ग्रीक, लातीन, या जुन्या भाषांत अल्परूपभेदानें असणारे एकार्थवाचक शब्द पुष्कळ सांपडतात. त्यांपैकीं मुख्य मुख्य शब्दांची यादी या पुरवणीच्या शेवटीं शोधक वाचकांच्या उपयोगाकरितां दिली आहे.

